## ||----अर्पण-पत्रिका ----||

इंटरनेट आणि फेसबुक मुळे

मला खूप खूप जिवलग मित्र मिळाले -

मित्र हो-

तुम्हा सर्वाना ही अक्षर-भेट सानंद सप्रेम---

----------------अरुण वि.देशपांडे

# प्रकाशकाचे शब्द...

श्री अरूण वि. देशपांडे सरांचं हे सुंदर “शो पीस” आपल्या हाती अलगद देतांना आम्हाला प्रचंड आनंद होतो आहे.

ई साहित्य प्रतिष्ठानची आजवरची २५० पुस्तकं, दोन चार अपवाद वगळता, नवोदित लेखकांची. दिनानाथ मनोहरांच्या “रोबो” च्या निमित्ताने या वर्षी प्रथमच आम्ही एका प्रथितयश लेखकाच्या साहित्याला ई पुस्तकात रुपांतरीत केलं. अजूनही मराठी भाषेत ई पुस्तकांना म्हणावी तशी जनमान्यता मिळालेली नाही. अजूनही लोक छापील पुस्तकांकडे ज्या आदराने पहातात तो आदर ई पुस्तकांच्या वाट्याला येत नाही. एके काळी नाटका समोर सिनेमा तुच्छ आणि सिनेमासमोर टिव्ही तुच्छ मानला जात असे तसेच हेही. पण ही माध्यमे वेगवेगळया प्रकारच्या गरजा भागवणारी एकमेकांना पूरक आहेत हे एकदा लक्षात घेतले की मग हा भेदाभेद संपतो.

अशा वेळी देशपांडेसरांसारखे लेखक जेव्हा उत्साहाने आपले ई पुस्तक बनवू देतात, तेही विनामूल्य, तेव्हा तो एकीकडे त्यांचा मोठेपणा तर असतोच, पण आमच्यासाठी आम्ही योग्य मार्गाने जात आहोत याची पावती असते. अरुण वि. देशपांडे हे साहित्य क्षेत्रातलं एक दबदबा असलेलं नांव आहे. तीसेक वर्षांपुर्वी त्यांची पहिली पुस्तकं यु म पठाण, राम शेवाळकर अशा बड्या हस्तींच्या हस्ते प्रकाशित झाली आहेत. तेव्हापासून ते आजवर बालवाङ्मयापासून ते संतवाङ्मयापर्यंत सर्वत्र त्यांचा मुक्त अणि अभ्यासपूर्ण संचार आहे. आजवर त्यांची बत्तीस पुस्तकं प्रकाशित झाली आहेत. नामवंत प्रकाशकांकडून त्यांच्या पुस्तकांना मागणी आहे. गेल्या तीस वर्षांत महाराष्ट्रभरातील अनेक साहित्य संमेलनं त्यांनी गाजवली आहेत. साने गुरुजीं पासून ते दासगणूंपर्यंत अनेक चरित्रं त्यांनी लिहीली आहेत. मराठीतल्या सर्व नामांकित मासिकांतून त्यांच्या कथा व कविता प्रसिद्ध झालेल्या आहेत. बालवाङ्मयावरचा समिक्षेचा त्यांचा ग्रंथ गाजला; एवढेच नव्हे तर त्याला महाराष्ट्र शासनाचा २००८-०९ चा सर्वोत्कृष्ट समीक्षेचा बहुमानाचा दि के बेडेकर पुरस्कार लाभला. असे अनेक पुरस्कार त्यांच्या साहित्याला लाभलेले आहेत. याशिवाय त्यांनी संपादित केलेल्या साहित्याची यादी न संपणारी आहे. त्यांनी अनेक साहित्यिक समारंभांतून अध्यक्षपद भूषवले आहे. त्यांच्या साहित्यविषयक कार्यावरच एक पुस्तक होऊ शकेल एवढे त्यांचे कार्य आहे.

पण आम्ही मात्र त्यांना मानतो ते एका वेगळयाच कारणासाठी. महाराष्ट्रातले बहुतांश बडे लेखक जेव्हा ई माध्यमाकडे “छोटे बच्चोंका खेल” म्हणून “आंख दाखवतात”, तेव्हा जे काही मोजके साहित्यिक या साहित्य व्यवहाराकडे गंभीरपणे पहातात, त्यातले अरुण वि. देशपांडे हे एक आहेत. त्यांच्या मार्गदर्शनाखाली विविध फ़ेसबुक व इंटरनेट मराठी साहित्य ग्रुप चालतात. ते अनेक ग्रुप्सना हरतऱ्हेने साह्य करून ही चळवळ सशक्तपणे आणि योग्य दिशेने कशी चालेल याची काळजी घेतात. हे करीत असताना ते कसलाही बडेजाव न करता, मुलांपैकी मूल होऊन काम करतात. साने गुरुजींच्या कार्याचा खरा वारसा तेच चालवीत आहेत असे आमचे मत आहे.

अनघा हिरे यांनी “माझ्या मना ई प्रकाशना”तर्फ़े त्यांची आमची गाठ घालून दिली आणि हा एक अनमोल ठेवा आम्हाला लाभला. म्हणून अनघाचे खास आभार.

सुनिल सामंत
(ई साहित्य प्रतिष्ठान)

# रसिक मित्र हो,-



१९८३ साला पासून मी अखंडपणे लिहितो आहे. या तीन दशकाच्या अक्षर-यात्रेत ३२ पुस्तकांची पालखी घेऊन चालण्याचे भाग्य माझ्या वाट्याला आलेले आहे. याचे श्रेय -माझ्याकडून लेखन करवून घेणाऱ्या संपादक मित्रांचे आहे. हे लेखन पुढे पुस्तक-रूपाने प्रकाशित करणाऱ्या प्रकाशक मित्रांचे आहे, त्यांच्यामुळेच "पुस्तके प्रकाशित असलेला एक लेखक-कवी, बाल-साहित्याचा लेखक-कवी" म्हणून मी थोडाफार ओळखला जातो आहे, याची मला जाणीव आहे. याहीपेक्षा मला वाचकांचे प्रतिसाद ,त्यांचे प्रेम लाभते आहे.

मित्र हो, तुमची प्रेरणा-तुमचे प्रोत्साहन, म्हणजे "वाचक-प्रेमाच्या कृपेची सावली " आहे हे मी कृतज्ञतापूर्वक सांगू इच्छितो.

माझा पहिला इ-कथा संग्रह- "झुळूक " नाशिकच्या अनघा हिरे यांच्या "माझ्यामना-ई-प्रकाशना" कडून २०११ मध्ये प्रकाशित झाला आहे. योगायोगाने हा दुसरा इ-कथा-संग्रह "शो-पीस", त्यांच्यामुळेच ई-साहित्य प्रतिष्ठानच्या माध्यमातून प्रकाशित होतो आहे, त्यांचे मन:पूर्वक आभार.

"शो-पीस" या संग्रहातील कथा या पूर्वी नामवंत मासिकातून आणि दिवाळी अंकातून प्रसिद्ध झालेल्या आहेत. या सर्व मान्यवर संपादक-स्नेहीमित्रांचा मी खूप खूप आभारी आहे.

माझ्या लेखन-वाटचालीत या सर्वांचा खूप मोठा आधार लाभलेला आहे.

माझ्या परिवारातील- माझी पत्नी -सौ.मीनाक्षी, चिरंजीव इंजी. अमित, सुनबाई सौ.डॉ.ज्योती, कन्या -सौ.गौरी आनंद असोदेकर, जावईबापू- श्री .आनंद रमेश असोदेकर, आणि लाडकी नात- कु.-नेत्रा आनंद असोदेकर - या सर्वांच्या साथीने माझी ही "लेखन-यात्रा" चालू आहे.

ई-साहित्य -प्रतिष्ठान आणि मित्र श्री. सुनील सामंत यांचा स्नेह-लाभ, ही सर्वात मोठी कमाई, प्रस्तुत "शो-पीस " कथा-संग्रहामुळे झाली आहे. सर्वांचे मन"पूर्वक आभार.

रसिक हो, तुमच्या अभिप्रायाची नेहमी प्रमाणेच प्रतीक्षा असणार आहे, ते जरूर कळवणे.

स्नेहांकित-

-अरुण वि. देशपांडे -पुणे

मो- ९८५०१७७३४२ , फोन- ०२०/६५२४०४७८

E .mail " arunvdeshpande @gmail .com

# अरुण वि. देशपांडे यांचे प्रकाशित साहित्यधन

## १.कथा-संग्रह

१. कुरूप रंग

२.रंग तरंग

३ अनुपमा

४. रंग फसवे

५. रंगपंचीविशी

६. नवऱ्यांची चाळ- (विनोदी कथा )

## २. कविता संग्रह. -

१. गानेदिवाणे

२. मन डोह

**३.नव-साक्षरांसाठी** - ४ पुस्तके.

४.संतकवी दासगणू वाङ्मय-दर्शन

(आस्वाद- समीक्षा)

५. बाल-साहित्य मराठवाड्याचे - नवे स्वरूप- नव्या वाटा .

(बाल-साहित्याचा २००८-०९ चा बालसाहित्य समीक्षेचा राज्य-पुरस्कार)

आगामी- बालसाहित्य -

१. आली आली परीराणी- बाल कविता

२. रेणूची गोष्ट- बाल कथा

## १. बाल-कथा

१.बागुलबुवा

२ स्वाव-लंबन

३पप्पू आणि गणु ढोल्या

४. सायलीची गोष्ट

५. बालवीर पप्पू आणि इतर गोष्ठी

६ मोन्या

७. गीरीबाबांची गोष्ट.

८ सोहमची गोष्ट .

## २. बाल-कविता

१.गोड गोड चीकोबा

२.धांगड -धिंगा -मौजमस्ती

३. माझा तिरंगा प्यारा

## ३. बाल- कादंबरी

१. चंदर

२. बंटी

३. फुलपाखरू

४. पप्पूची पत्रं

## ४.व्यक्तिचित्रणे

१. पप्पूचा अल्बम

**५.चरित्र** १. संस्कार -मूर्ती - सानेगुरुजी

**६. अनुवाद** १. श्रेष्ठ भारतीय बाल-कथा -(मल्याळी)

# कथानुक्रम

# शो-पीस

नोकरीत असेतोवर तोफ़ असणाऱ्या अनंतरावांची निवृत्तीनंतरची कथा

अनंतराव एक लोकप्रिय हेडक्लार्क म्हणून विख्यात होते. याचे रमाबाईंना भारी कौतुक होते ... त्यापेक्षा काकणभर जास्त अभिमान होता.

नवऱ्याच्या आवडींना जपणे, लक्षात ठेवून त्या पुरवणे, - असा प्रेमळ स्वभाव असणाऱ्या रमाबाईंनी इथल्या नव्या नव्या वातावरणात पलटी का मारली असेल? अनंतरावांना काही कळेनासे झाले.

# शोपीस

चला, सकाळचे अकरा वाजले, रोजचीच सवय, अनंतरावांनी घड्याळात पाहिले. त्यांचा आवडता शर्ट,त्यावर शोभणारी पँट,खिशात जेष्ठ नागरिकाचे कार्ड,सोबत घरचा पत्ता,फोन नंबर असलेले कार्डआणि थोडेसे पैसे, या साऱ्या गोष्टी व्यवस्थित खिशात टाकल्या. नंतर ते किचनमध्ये आले बाहेर पडण्या अगोदर जेवण.

जेवणाच्या टेबलावर त्यांचे सकाळच्या जेवणाचे ताट ठेवले होते. डॉक्टरांच्या सुचनेचे ताट-पेशंटला निमुटपणाने खायचे असते. अनंतरावांनी एक शब्द न बोलता, इकडे-तिकडे न पाहता-ताटातली एक पोळी, कमी तेलाची साधी भाजी, भाताची मूद, पातळ साधे वरण,पाच मिनिटात हा मेनू त्यांनी मनात साठलेल्या रागासहित गिळून टाकला- तांब्या भर पाणी गटागटा पिऊन टाकले. रिकामे ताट-रिकामी वाटी बेसीनमध्ये ठेवून देत,नॅपकिनने हात पुसत ते हॉल मध्ये आले.

टीव्हीच्या समोर बसलेल्या रमाबाई भान हरपून मालिकेच्या कथानकातील नवारा-बायकोच्या परस्पर थट्टा-मस्करीचा सीन पहात होत्या. आपल्या मागे अनंतरावा येउन उभे राहिले आहेत,हे त्यांना माहिती होते पण लक्षात ठेवून-त्यांनी अनंतरावाच्याकडे दूर्लक्ष करण्याचे ठरवलेले होते,तसेच ते आजही केले. निवृत्त झालेल्या अनंतरावांकडे आता लक्ष दयायची गरज नाही . घेतील ते स्वत:चे स्वत: करून, तेवढीच हालचाल होईल त्यांचे हातून. असा सोयिस्कर हिशोब करून रमाबाईंनी अनंतरावांचा हजेरी क्रमांक सर्वात शेवटी टाकून दिला होता.

अनंतरावांनी सुरूवातीला खूप आरडा-ओरडा करून पाहिला,रूसून पाहिले,फुगून पाहिले,रमाबाईंनी या प्रकारांना किंमतच दिली नाही. त्यांच्या मते अनंतरावांना आता काही काम-ना-धाम,मग  मुझे गिनो'- हा हट्ट कशासाठी?

चहाच्या वेळेला चहा, खाण्याच्यावेळी खाणे- यात तर टाळाटाळ नव्हती केली ना? मग रिकाम्या अनंतरावांनी स्वत:चे महत्व विनाकारण वाढवून ठेवण्याचा आटापिटा करू नये.- असे रमाबाईंनी अनंतरावांना वेळोवेळी सुचवून पाहिले, नंतर सुनावून पाहिले.

हळूहळू अनंतराव निवळत गेले आपण 'आता उरलो नावापूरता, - हेच शेवटी सत्य आहे. हे कबूल करणे त्यांना फार जड गेले. पणे ते स्विकारण्याशिवाय दुसरा उपाय नाही हे स्वत:च्या मनाला पटवून देण्याचा ते प्रयत्न करू लागले.

कायम स्वत:च्या मनाप्रमाणे वागणाऱ्याला,त्याच्या मनाविरूध्द वागण्याची वेळ येते- त्या वेळेचे सारेक्षण त्याला विलक्षण अपमानाचे आणि मानहनीचे वाटत असतात.

अनंतरावांना निवृत्तीनंतर तसे काही कामच उरले नव्हते. पण रमाबाईंच्या बाबतीत तसे नव्हते. स्वत:च्या संसाराची सूत्रे यशस्वीपणाने स्वत:च्या हातात ठेवत त्यांनी, आता दुसऱ्या पर्वात स्वत:चे महत्व तसूभरही कमी होउ दिलेले नव्हते.

मुलाच्या नव्या-नवलाईच्या संसाराला त्यांनी स्वत:च्या मार्गदर्शनावर हुकुम व्यवस्थित सांभाळण्याचे ठरवले,त्याला मुलांचा म्हणजे त्यांच्या चिरंजीवांचा ,मुख्य म्हणजे सूनबाईंचा सकारात्मक होकार होता.कारण दोघांच्याही नोकऱ्या,त्यासाठी सुटीशिवाय इतर दिवशी घरसंसार करण्यास वेळ न मिळणे,हेतर कारण होतेच,त्याचबरोबर रमाबाईंच्या हातात सर्व चाव्या असणे सर्वाच्या हिताचे आणि कल्याणाचे कसे आहे-याचे महत्वाचे बौध्दिक खुद्द सुनबााईंच्या मातोश्रींनी -दिलेले असल्यामुळे,अनंतरावांच्या घरात -नव्हे-यापुढेमुलाच्या संसारात सासूबाई-रमाबाई,आणि सूनबाई-अनघा,यांचे सर्वच बाबतीत अगदी गोड-एकमत रहाणार याचे स्पष्ट चित्र तयार झाले.

रमाबाईंनी बदलत्या परिस्थितीचा अचूक अंदाज घेत,नव्या मार्गदर्शक सुचना करीत मुलाच्या-सुनेच्या दैनंदिन जीवनाचे वेळापत्रक इतके सुखकर तयार करून दिले की सौ.सूनबाईचे हृदय सासुबाईंच्या आदराने काठोकाठ भरून गेले आणि या सासुबाईंनी जर असा आधार दिला नसता तर, आपले काही खरे नव्हते- हा समज अधिकच दृढ झाला. अनपेक्षितपणे आपली नवोदित पत्नी,नव्या घरात शांतपणे आणि समाधानाने रूळत आहे. या आनंदाच्या भरात अनंतरावाच्या चिरंजीवाला आईचे अपरंपार अप्रूप वाटे. त्याची मातृभक्ती वाढली.

शहरातल्या पध्दतीप्रमाणे घरकामासाठी कामवाल्या बाई असल्यामुळे श्रम पडणारे काम रमाबाईंना करावे लागणार नव्हते. कसलेल्या कार्यकुशल अधिकाऱ्याचे जे कर्तृत्व तेज त्याच्या चेहेऱ्यावर झळकत असते,अगदी तशीच झळाळी,तडफ आणि आत्मविश्वास रमाबाईंच्या चेहेऱ्यावर झळकतो आहे,आणि या व्यक्तिमत्वाचे महात्मय दिवसागणिक वाढत जाणार याची जाणीव अनंतरावांच्या मनातल्या उमेदीचे खच्चीकरण करणारी ठरत होती.

एकुणच रमाबाईंनी आपली पोजिशन आणि स्टेटस अगदी सेफ करून ठेवीत,त्यांच्या स्वत:शिवाय घर व्यवस्थित चालणार नाही हा विश्वास (?) साऱ्यांच्या मनात निर्माण केला.

रमाबाईंच्या व्यक्तिमत्वातला हा सफाईदार बदल अनंतरावांना आश्चर्याचा धक्का देणारा होता. काही दिवसांपुर्वीची गावाकडल्या आपल्या नोकरीच्या गावातल्या सेमी अर्बन, माहौल मधल्या संसार सांभाळणाऱ्या रमाच्या व्यक्तिमत्वात सर्वसाधारण संसारी गृहिणीचेच गुण ठासून भरलेले होते. तिथल्या घराघरातल्या बाईमाणसांना स्वत:च्या संसाराचे,पोरा-बाळांचे कौतुक असतेच-असते,त्याही पेक्षा त्यांच्या 'अहो'-त्यांचे हाफिसातील महत्व,त्यांची पोस्ट'- या गोष्टी बद्दलचे अपार कवतिक बोलण्यातून व्यक्त होत असे.

अनंतराव तर एक लोकप्रिय हेडक्लार्कम्हणून विख्यात होते. याचे रमाबाईंना भारी कौतुक होते- त्याही पक्षा अभिमान काकणभर जास्तच होता.

नवऱ्याच्या आवडींना जपणे,लक्षात ठेवून त्या पुरवणे- असा प्रेमळ स्वभाव असणाऱ्या रमाबाईंनी इथल्या नव्या-नव्या वातावरणात अशी पल्टी का मारली असेल?अनंतरावांना काही कळेनासे झाले.

नवरा-बायकोच्या खाजगी व्यवहारातही रमाबाईंनी सेन्सॉरशीप लागू करून अनंतरावांच्या मनात रंगणाऱ्या 'सेकंड इनिंग्ज हनीमूनच्या स्वप्नाळू फुग्यांची हवा सोडून दिली.

हळू आवाजात बोलतांनाही आजकाल रमाबाईंच्या आवाजाला तेजधार असते,हे जाणवून अनंतराव सहसा एकटं बसण्याचं पसंत करून, त्यांच्या आणि रमा बाईंच्या नावाने ओळखल्या जाणाऱ्या बेडरूममध्येच बसून रहात. वयाच्या साठाव्या वर्षी स्वेच्छानिवृत्त झालेल्या अनंतरावांना रमाबाईंची सातत्याने आता तुम्ही म्हातारे झाला आहात पोरासोरांच्या समोर तुमच्या वयाला शोभेल असेच बोलायचं,वागायचं हे लक्षात असु द्या नाही तर वागाल अघळ-पघळ अन पाहाणारे म्हणतील-'अनंतरावांना म्हातारचळ लागलाय वाटतं!' तुमची अशी हास्यास्पद अवस्था मला चालणार नाही आणि आवडणारही नाही. एकतर्फी खटल्यातल्या निकाल पत्राचे वाचन ऐकणाऱ्याप्रमाणे अनंतरावांची अवस्था व्हायची.

रसिक स्वभाव मनातल्या कप्यात हळूवारपणे जपण्याची आपली सवय,यापुढे धूळखात मनातल्या मनात पडून राहाणार याची पक्की खात्री पटत गेली. त्यावेळे पासून आपल्या उर्वरित जगण्यातला चार्म निघुन गेलाय, उत्साह आटून गेलाय असे त्यांना वाटू लागले.

रमाबाईंचा बदलत्या स्वभावापुढे अनंतरावांच्या मनातल्या 'रमाची'रंगवलेली प्रतिमा फसव्या रंगाची ठरली आहे. आपल्या मनाला अपेक्षित होती,रमाची संयमीत आणि जाणत्या जोडीदाराची ,जिच्या साथीने,प्रतिसादाने इंद्रधनुषी रंग पुन्हा नव्याने आकारून यावेत.

पण ब्रशच्या फटकाऱ्याने चित्र रंगण्याएवजी विस्कटून जाण्याचे पहाणे अनंतरावांच्या वाट्याला आले.रमाबाईंनी आपल्या सर्व भाव-भावनां जणू मनाच्या कप्प्यात नव्हे तर बंदिस्त कपाटात ठेवून दिल्या होत्या.

अनंतरावांच्या असोशीपणाची रमाबाईंना विलक्षण चीड येत होती. डोळ्यात स्पष्टपणे दिसणाऱ्या भावना अनंतरावांना लपवणे शक्य नव्हते आणि जमतही नव्हते, त्यांची अवस्था पाहून रमाबाईंना राग आवरणे कठीण होत होते. एक दिवस त्याचाही उद्रेक झालाच.

अनंतरावांना पिंजऱ्यात उभे करीत त्यांनी सुनावले- तुमच्या मनाला तुम्ही आवरू शकत नाहीत, याची तुम्हाला तरी स्वत:बद्दल लाज वाटत नाही का?

अहो, आतापर्यंत आपण जे काही अनुभवले, त्या आनंदाची आठवण मला पुरेशी आहे, तृप्त मनाला आता कशाचीच ओढ उरलेली नाही, अशा वेळी तुम्ही, म्हणजे ? - श्शी! अशी स्पष्ट कानउघाडणी अनंतरावांनी या आधी सहन केली असती? आणि या रमाची तरी या अगोदर अशी हिम्मत झाली असती ? मुळीच नाही, आपण त्यावेळी कमावते होतो, मिळवते होतो,मनाची एक खुर्ची कायम आपल्या नावे होती, रमाला याचे भान नक्कीच होते. मग हा अनंतराव एकदम एवढा- आणि इतका निरूपयोगी ? पेन्शनर - आणि मोडीत काढलेला भंगार माल! - एकाच तराजूत मोजण्याच्या वस्तू झाल्यात ?

रमा मनाने एवढी कठोर आणि व्यवहारचतूर झाली ते स्वत:साठीच ना. मुलाच्या संसार राज्याची पालकमंत्री होण्यात तिला खूप काही मिळाले, बदल्यात तिने आपला जवळजवळ त्यागच केलाय. तिची प्रायोरिटी लिस्ट बघा -त्यात -

अनंतरावांना जागाच नव्हती, पहिला नंबर मुलाचा– त्याच्या आवडीनिवडीचा, त्याच्या बद्दलच्या काळजीचा,दुसऱ्या नंबरवर तिची लाडकी सूनबाई,तिचे कवतुक,तिची काळजी, नंतर – मुलाचा संसार,त्यातील समस्या,अडचणी,त्यावरच्या उपाययोजना याबद्दलचे सतत विचार– त्यानंतर रमाबाईंच्या स्वत:च्या प्रकृती –स्वास्थ्याचे काटेकोर पालन,आपल्या परिवारातील सर्व नातेवाईकांचे आस्थापूर्वक करण्यात रमबाईंनी नावलोकिक मिळवला होता, तो तसाच टिकला पाहिजे,यासाठी जाणीवपूर्वक प्रयत्न करणाऱ्या रमाबाईंची दिवसाअखेर प्रचंड दमछाक व्हायची. त्यावर विरंगुळा म्हणून उशिरापर्यंत टीव्ही, – मालिका पहाता पहाता भरल्या मनाने ,सूनबाई आणि मुलासाठी उद्यापासून नवे काय–काय करायचे हे ठरवता – ठरवता गाढ झोपी जायच्या,शेजारी टक्क जागे असणारे अनंतराव रमाबाईंचे घोरणे शांतपणे ऐकत सकाळ होण्याची वाट पहायचे. गम्मत म्हणजे या प्रकाराची आता त्यांना सवय होउन गेल्यामुळे उजाडलेल्या पहाटे त्यांची होणारी चीड चीड अलीकडे कमी झाली आहे, ही गोष्ट किती छान झाली हे खुद्द रमाबाईंनी लक्षात आणून दिले.

गेल्या काही दिवसांपासून सुटीच्या दिवशी ‘घरातल्या सर्वांचे एकत्र जेवण’ हा कार्यक्रम अनंतरावाच्या फक्त उपस्थितीत संपन्न होत असतो. मुलाच्या कंपनीतले हाय–फाय कल्चर आपल्या कक्षे बाहेरचे आहे, असे कबुल करून अनंतराव लेकाच्या नव्या जमान्यातील गोष्टी शांतपणे ऐकत पुढ्यातल्या ताटातील जेवण उरकत असायचे.

रमाबाई आणि सूनबाई आगामी कार्यप्रसंगाची आखणी करण्यात रंगून गेल्यामुळे त्यांचे जेवण आपोआप रंगतदार व्हायचे. या सगळया बदलत्या वातावरणात या घरांतील एक हलती–चालती,श्वासोश्वास घेणारी,मन हरवून बसलेली एक मानवी आकृती अशी आपला अवस्था करून टाकली आहे,टाकली गेली आहे, आणि आपणही ती मान्य करून टाकली आहे.

या विरूध्द आवाज उठवायचा? हे तर खुपदा मनात येउन गेलेले, किंवा घर सोडून गावाकडे परत जाण्याची धमकी द्यावी तर तिकडचे सगळे विकून टाकीत इथ येउन बसलोत.

स्वत:चे पेन्शन ही एक स्वतंत्र्याची गोष्ट ,जी हाताशी होती, पण त्याचेही अप्रुप घरात कोणाला असणे अपेक्षित नव्हते. ''मुलाचा पगार, सुनबाईचा पगार,'' अनंतरावाच्या पेन्शन रकमेच्या किती पट होता, हेही अनंतराव पटापट सांगु शकत नव्हते.आपण असे गावातले ‘ढ’ कसे ठरलोत?रमाने स्वत:ला इतके बदलवून केव्हा आणि कसे टाकले,खरच डोके चालत नाही हेच खरे.

’आहे त्या परिस्थितीत सुख मानुन घ्या’ त्यातच तुमचे,माझे– सर्वांचेच भले आहे. रमा चूक सांगत नाही,हेच मान्य करतांना आपण स्वत:वर चरफडतो आणि पुन्हा पुन्हा मन:स्ताप वाढवून घेतो. सहजतेने स्वत:ला,स्वत:च्या भल्यासाठी मुलाच्या संसाराशी समरस होऊ शकणारी रमा खरच हुशार,समयसूचक म्हणावी का? की स्वत:ला असे वागणे जमणार नाही,कारण मनात कुठतरी दुय्यमपणा स्विकारावा लागणार ही शरणागताची भावना मनाला अधिक वेदना देणार! अशा कितीतरी प्रश्नांच्या भोवऱ्यात अनंतराव गरगरत होते. यातून बाहेर पडण्याचा सोयिस्कर मार्ग ही उपलब्ध होता, रमाबाईचे सांगणे योग्य आहे, हे मान्य करायचे, आणि तसे वागायचे, एवढीच गोष्ट करायची आहे,

अनंतराव बाहेर जाण्याच्या तयारीने बैठकीतल्या कोपऱ्यात बसले, आधुनिक सजावटीच्या त्या ड्रॉइंगहॉल मध्ये भारीभारीची आणि देखणी ‘शोपीसेस’ आकर्षकपणाने लक्ष वेधून घेत होती.

एका कोपऱ्यात ते शांतपणे बसून राहिले. उद्यापासून या सर्वांमध्ये राहणारे अनंतराव निर्विकारपणाने ‘शोपीस’ सारखे घरात रहाणार होते. पहाणारा कदाचित म्हणेल सुध्दा– रियल शोपीस!

# अण्णांची गोष्ट

लोकांच्या भानगडी हेच स्वतःच्या जीवीताचे साधन करणाऱ्या एका बदमाशाची कथा...

आपलं पोट भरण्यासाठी अण्णांची नजर अडचणीत सापडलेल्या, नाजूक अडचणीत पकडलेल्या पैसेवाल्यावर असायची. “नाक दाबून तोंड उघडण्याचं” अण्णांचं कसब या धंद्यात मोठं छान साधायचं. असंच एकदा एक पैसेवाला नाजूक अडचणीत फ़सला., सुटण्याचा काही मार्ग दिसत नव्हता. त्याच्या मुलीला प्रेमात कुणी फ़सवलं. बापाने स्वतःच्या पोरीला अर्धवट वेडी ठरवून टाकले, तिच्या पदरात सहानुभूतीचे माप टाकले. तीक्ष्ण नाकाच्या , तिखट कानांच्या अण्णांना लगेच या प्रकरणाचा वास लागला.

# अण्णांची गोष्ट

अंगणात असलेली जुनाट खोली कित्येक वर्षांपासून जागा अडवून बसली होती. गेल्या पिढीपासून या खोलीत 'नको झालेल्या - नको असलेल्या वस्तू आणून टाकण्याची पध्दत होती' अडगळींच्या वस्तूंचे नशीब अचानक बदलले,भंगारवाल्याकडे त्यांची रवानगी होत असे कारण गेल्या दहा-पाच वर्षांपासून या खोलीला 'दिनुअण्णांची खोली म्हणत असतात. दिनुअण्णा जरी खोलीत नसले तरी या खोलीच्या स्वरूपात बदल होणार नव्हता कारण ' नको-नकोसे झालेले दिनुअण्णा आणि अडगळींच्या वस्तू यांच्यात काही फरक नव्हता. फक्त रस्त्यावर येण्याचे टळले. ही समाधानाची गोष्ट म्हणायची.

अण्णांचा बहात्तरवा वाढदिवस केव्हा आला नि गेला. कुणालाच पत्ता नव्हता. 'माणुस जन्मला त्याची आठवण सुखदायी असते म्हणून वाढदिवस.' हे त्या आठवणीचे स्वरूप मान्य होण्यासारखे आहे. अण्णांनी स्वत:च्या वाढदिवसाची आठवण नसे,तो साजरा व्हावा अशी अपेक्षा कधीच नव्हती, आणि घरच्यांनी अण्णांचा जन्मदिवस लक्षात ठेवण्याचा प्रयत्न कधीच केला नव्हता. स्वत:च्या जन्माला येण्यावरच अण्णा नाखुश होत, जन्मभर नाखुश राहिले, रहाणार होते.

अण्णांची अवस्था 'जीव जात नाही - म्हणून जिवंत' अशा सोप्या शब्दात करता येत होती. जगाकडे नजरभरून पहाणारे त्यांचे डोळे केव्हाच विझून गेले होते. शून्य नजरेच्या त्यांच्या डोळ्यातली बुबुळे निर्जीवपणे डोळ्यांच्या खोबणीत फिरत असायची,त्यातभर म्हणजे दोन-तीन वर्षांपूर्वी पक्षघाताचा झटका शरीराला लुळे करून पसार झाला होता. अण्णांचे शरीर व्यवहार पहाण्यासाठी मग एक मदतनीस चोवीस तासासाठी आणली गेली आणि घरच्यांनी मग अण्णांवर दूरूनच लक्ष ठेवणे पसंत केले.

निरूपयोगी हात-पाय,नजर गेलेल्या डोळ्यांचे अण्णा पलंगावर कसे-बसे टेकुन बसु शकत असत. असे बसले म्हणजे अण्णांचे तिखट कान जागे होत, घरात कुठे काय बोललं जातयं याचा वेध त्यांचे कान घेत असत. या तिखट कानांची जिवलग मैत्रिण म्हणजे -अण्णांची जहाल-तितकीच फटकळ फटाकडी जीभ अजूनही पूर्णभरात होती. अण्णा दिवसभर या जीभेच्या मदतीने जगभराचा उध्दार करीत असतात.

ही सवय काही आजकालची नव्हती,'पाळण्यात पाय हलवण्याचे दिवस संपले,आणि जगाला हात दाखवण्याचे दिवस आले' अण्णांचा वडिलांना-अप्पांना सहा अपत्ये झाली. चार मुले दोन मुली क्रमांक चारवर अण्णा.आपली अशी झालेली गोची अण्णांनी कधीच सहन केली नाही. मोठे तीन भाऊ- धाकट्या दोन बहिणींनी अप्पांचे,आईचे गुण-रूप घेतले होते,मधल्या अण्णांच्या वाट्याला मात्र नशिबाने उलटे माप टाकले होते. गोऱ्या गोमट्या,हुषार चटपटीत भावा-बहिणींत अण्णांच्या वाट्याला कुरूप वाटावे असे रूपडे आले होते. अतिसामान्य रूपाच्या अण्णांनी कळत्या वयापासून जगावर सूड घेण्याचे मनोमन ठरवले. 'मला सुख नाही-मी कुणालाच सुख मिळू देणार नाही'- हा त्यांचा जीवन-मंत्र ठरला.

बाह्यरूपामुळे आपल्याला सगळे हिणवतात या भावनेने अण्णा सगळ्यांपासून दुरावत होते. आईला तर आपली सगळी मुलं सारखीच पण अण्णां आईशी सारखे भांडत तिच्या मनाला यातना देणारे शब्द ऐकवून अधिक त्रास देण्याचा आनंद अण्णा मिळवू लागले.

कुणी कितीही जुळवून घेण्याचा प्रयत्न करो,काही उपयोग नाही. शेवटी शेपूटच वाकडी- अशा प्रकारे भावा-बहिणींची निराशा व्हायची. भावाभावातले,बहीण-भावातले संबध कधी जुळलेच नाही. सगळ्यांशी कायमपणे वैर असल्यासारखे अण्णा वागू लागले.मोठा भाउ असो,लहान बहीण असो आपल्या भावा-बहिणीच्या खोट्या -नाट्या चुगल्या करायच्या हा त्यांचा उद्योग आणि अण्णांचे वडिल कच्च्या कानांचे,हलक्या मनांचे,अण्णांचे ऐकून संतापी अप्पा बायकोला,पोरांना खुप छळायचे.

घरातला कर्तामाणूस असा हलक्या कानांचा असणे,घरातल्या माणसांसाठी दुर्दैवाची गोष्ट असते,अण्णांचे अप्पा सुमारकुवतीचा सामान्य माणुस,स्वत:विषयी मात्र अफाट काल्पनिक स्वप्ने पहाण्याची सवय अप्पांना होती. त्यांच्या वाट्याला आलेल्या सामान्य वास्तवाने त्यांच्या स्वप्नांचा चक्काचूर झाला आह अशी त्यांची पक्की समजूत होती. अण्णांनी अप्पांच्या शेखमहंमदी स्वप्नाळूवृत्तीचा फायदा घेत ,घरातल्या माणसांबद्दल अप्पांच्या मनात कायम चीड आणि संताप निर्माण केला आणि मग संतापी अप्पा अण्णांच्या भावा-बहिणींना मनांची शांती होईपर्यंत बदडून काढीत.अण्णा आणि अप्पा-बापलेकांच्या जोडीला सारेगाव 'विघ्नसंतोषी'म्हणून ओळखू लागली होती. या दोघांच्या अशा वागण्यामुळे घरात सणासुदीच्या दिवशी,समारंभ

प्रसंगी,आनंदाच्या प्रसंगी काळजीचे वातावरण असे. अशा सुंदर प्रसंगाचा विचका कसा करता येईल? आनंदावर विरजण कसे पडेल? याचाच विचार गंभीरपणे अण्णा करीत असत,अप्पांची समर्थसाथ योग्य वेळी मिळत असे.

'स्वत:च्या अपयशाचे खापर सोयिस्करपणे दुसऱ्याच्या माथी फोडणे' – अण्णांनी हे सूत्र निर्वेधपणे आयुष्यभर वापरले. अण्णांच्या अप्पांचे आणि आईचे आयुष्य – त्यांच्या बद्दल 'नवरा-बायकोचे सहजीवन 'वगैरे शब्द वापरता येतील अशी स्थिती कधीच नव्हती. अप्पांच्या लग्नाच्या काळात तर हे शब्द प्रचलित सुध्दा नव्हते. त्यावेळच्या लहानश्या गावात खेड्यात लग्न झालेल्या बायकांना सासूरवास,सासरचा छळ आणि नवऱ्याचा जाच या गोष्टी आंदणात मिळत असतात असेच वाटत असेल.अण्णांचे अप्पा अशा नवऱ्याचे धडधडीत आणि जळजळीत उदाहरण होते.

आपले नशीबच फुटके असावे म्हणून अप्पांची बायको म्हणून जगण्याची शिक्षा भोगणे आले असावे. अण्णांच्या आईचे नशीब चांगले तर नव्हतेच,अप्पांच्या घरात आल्यावर तर ते अधिकच बिघडले. 'संशयी स्वभावाच्या नवऱ्या बरोबर जन्म काढणे' या सारखी दुदैवी आणि अपमानास्पद घटना त्या स्त्री च्या आयुष्यात दुसरी नसेल. अण्णांच्या आईला अप्पांची बायको म्हणून जगतांना ही जालीम शिक्षा भोगावी लागली होती. अप्पांच्या हीन वागणुकीमुळे तिच्यावर ना पोरांनी कधी माया केली ना नवऱ्याने कधी कदर केली. अण्णांच्या उपेक्षित आणि एकाकी आईची अखेर अशीच झाली. 'एक जीव आला- तसाच गेला',कुणाला त्याचे सोयर नि सुतक'.अप्पांच्या बायकोबद्दल अण्णांच्या आईच्या जगण्याबद्दल यापेक्षा वेगळे काही सांगताही आले नसते.

अप्पांच्या हिस्स्याला वडीलोपार्जित इस्टेट ती काय असणार? तीन खोल्याचे राहते घर,डागडूजी करून खिळखिळे झालेले ते घर गावाकडे असलेली खुडूक जमीन. अण्णांनी अप्पांना गोड बोलून फसवून ही इस्टेट (?) बळकावली, फाटके अप्पा अण्णांच्या मेहेरबानीने भिकेला लागले. नोकरीच्या निमित्ताने अण्णांच्या भावांनी गाव सोडले, पुढे त्यांच्या भितीने घर सोडून दिले. धाकट्या बहिणींचा संसार यथातथा त्यांना माहेराहून कधी काही मिळेल? याचे स्वप्नसुध्दा अण्णांच्या बहिणींना कधी पडण्याची शक्यता नव्हती. अण्णांच्या उपद्व्यापी कारवायांनी बहिणींच्या नवऱ्यांना भर बाजारात खाली मान घालण्याची पाळी आली. मेहुण्यांनी अण्णांच्या बहिणींचे नसलेले माहेर बंद केले. अण्णांसारख्या एका फाटक्या अवलीयांने त्यांच्या भावा-बहिणीच्या सामान्य जगात नुस्ती धांदल माजवली होती.

दिवस उजाडला की अण्णांना घराबाहेर पडत. स्वत:च्या फायद्यासाठी एखाद्याला फसवणे याचे त्यांना कधीच दु:ख नसे. गावात कुठे भांडण -तंटा असुदे,पैसेवाल्याच्या बाजूने अण्णा ठामपणे उभे राहात. मग कोर्ट-कचेऱ्या सुरू झाल्या की अण्णांची दिवसभराची सोय होऊन जाई. वकीलांचे अशील एखादेवेळी हजर राहाणार नाही,अण्णा मात्र वेळेच्या आधी कोर्टाच्या आवारात दिसायचे. पैसा मिळवण्यासजाठी 'साम-दाम-दंड' हे सूत्र बिनदिक्कतपणाने वापरणारे अण्णा गावभर उजळमाथ्याने फिरत, पैसेवाल्यांचा भक्कम आधार अण्णांच्या पाठी होता. वयाने वाढत जाणारे अण्णा रंगाने काळे होते, आपल्या कृष्णकृत्याने अधिक काळेकुट्ट होत गेले. सिनेमात काम करण्याची संधी अण्णांना मिळाली असती तर आपल्या अंगभूत गुणांच्या जारावर 'कुरूप खलनायक' म्हणून नक्कीच फेमस झाले असते.

लौकिक जगतांना लागणारी सर्व सुखसोयी अण्णांनी लोकांना दुखवून,फसवून मिळवल्या होत्या. या साधनांचा ते मनमुराद उपभोग घेत. त्यांच्याकडे पाहून 'निर्ल्लजम सदा सुखी!' म्हणजे काय?याचे उत्तर मिळाले असते. गैरधंदे करणाऱ्या पैसेवाल्यांना बेदरकार अण्णांचा आधार होता. पोसलेला-पाळलेला शिकारी कुत्रा ज्या इमानदारीने मालकाचे रक्षण करतो तशा इमानदारीने अण्णा उपकारकर्त्याच्या पाठी उभे रहायचे.

साध्या सरळ माणसांना कोंडीत पकडून त्यांना त्रास देण्यात अण्णांना मनापासून आनंद मिळे. अशी माणसे भितीपोटीच अण्णांच्या सावलीपासूनही पळ काढहीत. पैशाचा अभाव ही अडचण भल्याभल्यांना लाचारीने हात पसरायला लावते, अशा अडलेल्यांना मदत करणारे पैसे-वाले-वसूलीसाठी खास अण्णांची मदत घ्यायचे- हे काम तर अण्णांचे खुप आवडते. कुणाच्या ही जखमेवरची खपली काढली म्हणजे आनंद वाटे. समोरच्या व्यक्तीला यातना झालेल्या पाहणे,दु:खाने होरपळणे,हे बघण्यासाठी अण्णा सदैव आसुसलेले असत. देवदूत न होता यमदूत होण्याचे अण्णांनी ठरवले असावे असे अण्णांच्या वागण्यातून जाणवत असे.

वसुलीच्या ठिकाणी अण्णांना आलेले पाहूनच देणेकरी गोठून जाई. अण्णांनी तोंड उघडले की त्यांच्या स्वैर आणि सैल जीभेच्या पट्ट्याने कुणाचे कसे वस्त्रहरण होईल याची शाश्वती नसे. निमूटपणे पैसे देणे एवढेच काम तो करी,तरीही अण्णांनी

त्याला फटकारणे सोडलेले नसे. आपल्या या वागण्याचे झकास समर्थन करण्यात अण्णा काहीच वाटत नसे. सगळी दुनिया,सगळे लोक लुच्चे,बदमाश,लफंगे वरून छान आतून घाण – त्यांना मी तरी सोडणार नाही. हा अण्णा वरून काळा– आतूनही त्यापेक्षा काळा आहे समजल?

आपल्या पोटभरण्यासाठी अण्णांची नजर अडचणीत सापडलेल्या, नाजूक अडचणीत पकडलेल्या पैसेवाल्यावर असायची.'नाक दाबून तोंड अघडं ठेवण्यांच ' अण्णाचं कसब या धंद्यात मोठ छान साधंल होत. असचं एकदा एक पैसेवाला नाजूक अडचणीत फसला, सुटण्याचा काही मार्ग दिसत नव्हता. त्याच्या मुलीला प्रेमात कुणी फसवले . मुलीच्या बापाने स्वत:च्या पोरीला अर्धवट वेडी ठरवून टाकले,तिच्या पदरात सहानुभूतीचे माप टाकले. तीक्ष्ण नाकाच्या,तिखट कानाच्या अण्णांना लगेच या प्रकरणाचा वास लागला. अण्णांनी खोलवर लक्ष घातले, त्यांच्या गळाला पोरीचा पैसेवाला बाप अचूक लागला. त्या बापाच्या पोरीला अण्णांनी स्वत:ची बायको म्हणून घरात आणले. त्या दिवसांपासून अण्णांच्या उशाशी भक्कम तिजोरीच्या किल्ल्यासुध्दा आल्या.

रजनीबाई,फसवली गेलेली मुलगी,बापाने अर्धवट वेडी ठरवलेली, प्रत्यक्षात पूर्णपणे भानावर असलेली होती. प्रसंगाचे गांभीर्य ,स्वत:चे भवितव्य ओळखले,बापाविरूध्द आपण बंडखोरी करू शकणार नाही या मर्यादेची जाणीव तिला होती आणि समजा तसा प्रयत्न करून पाहिला असता तर 'अण्णांसारखा दैत्य बापाच्या मदतीला होता'स्वत:च्या अब्रुचे धिंडवडे काढण्यापेक्षा अण्णांची बायको होणे रजनीबाईने पसंत केले. पुढचं पुढे असा तिचा हिशोब होता 'अण्णांन कधीही सोडून जाणार नाही'असे वचन तिच्या बापासमोर अण्णांनी मिळवले होते. रजनीबाईचा बाप खरा हुशार माणूस –पोरीच्या नांवची इस्टेट त्याने अण्णांच्या नांवावर अखेर पर्यंत केलीच नाही उलट रजनीबाईची इस्टेट तिच्यानंतर तिच्या मुलांना मिळावी असे नवे कलम मृत्युपत्रात टाकून दिले. त्यामुळे रजनीबाई अण्णांवर तशी अवलंबून नव्हती. अण्णांना त्यांच्या आयुष्यात भेटलेला पहिला सव्वाशेर – रजनीबाईचा बाप निघाला.

रजनीबाईच्या रूपाने अण्णांना निर्जीवमनाचे एक सुंदर शरीरयंत्रच मिळाले होते. रजनीबाईच्या आयुष्यात 'सुखाची रजनी' कधीच येणार नव्हती. अण्णांच्या गडद काळ्या सहवासातली 'तशी प्रत्येक रात्र ' भोगणे हेच रजनीबाईचे नशीब होते. कधी नव्हे तो अण्णा पहिल्यांदा आपल्या नशीबावर खुष झाले होते. रजनीबाईची सुखप्राप्ती हा त्यांच्या स्वत:च्या हेव्याचा विषय झाला. ' लंगूर के घर अंगूर 'अशी स्थिती अण्णांची झालेली होती.

सुखाचे कोवळे दिवस आपल्या वाट्याला येणार नाहीत, असे समजूतदारपणे रजनीबाईने स्विकारले होते. अण्णा – रजनीबाई या नवरा–बायकोंना परस्पर सहवासामुळे मुलं झाली. रजनीबाईच्या नशिबाने पोरांनी अण्णांचे रूप घेतले नव्हते आणि पुढे त्यांचे गुण ही घेतले नाही. बापापासून त्यांना कायम दूर–दूर ठेवायाचा निर्णय रजनीबाईंनी घेतलेला होता.

अण्णांच्या वाट्याला कधी नव्हेतो सुखसमाधान आले होते. रजनीबाईची इस्टेट उशाला होती. सुखाची झोप सहजपणे येउ लागली. बाजारातला त्यांचा वावर कमी झाला,अनेक लोकांना सुटलो बाबा असे वाटू लागले होते. अण्णांना ही रोजच्या उपद्रवी कामाचा थोडा कंटाळा आल्याचे वाटत होते. गडी सुस्तावल्या सारखं झाला होता.

आयुष्यभर समोरच्या माणसाला नाचवणाऱ्या अण्णांना एका जागी स्थिर राहणे नकोसे वाटू लागले, त्यांच्या डोक्यातले किडे एकसारखे वळवळत. त्याच वेळी अण्णांच्या शरीराने साथ देण्यास विरोध आहे हे सांगायला सुरूवात केली, शरीरात वस्ती करायला आलेल्या व्याधींनी अस्तित्व दाखवण्यास सुरूवात केली आणि अण्णांच्या भक्कम इमारतीला हादरे बसण्यास सुरूवात झाली.

लोकांना सदैव कडू जहर बोलणाऱ्या अण्णांना सर्वात अगोदर साखरेची बिमारी झाली. खाण्यावर बंधने आली,जिभेचे चोचले बंद झाले. त्यावरची औषधे घेता घेता,रक्तदाबाने उचल खाल्ली,या दुहेरी आघाताने अण्णा खचले. मधूमेहावर इलाज की बीपीवर इलाज? अण्णां या प्रश्नावर नुसते झुलत होते. बिमारी तर दोन्ही खतरनाकच की 'खाल्ल तरी त्रास न खाल्ल तरी त्रास' अण्णांना काय खाऊ? हा प्रश्न पडत होता. आयुष्यभर दुसऱ्याच्या तोंडचा घास हिसकावून घेण्यात आनंद मानणाऱ्या अण्णांच्या तोंडात अन्नाचा घास जाण्याची मारामार झाली होती.

मधुमेह आणि रक्तदाबाच्या त्रासामुळे अण्णांचे हिंडणे फिरणे धोक्यात आले. कुठेही–कधीही चक्कर येउन अण्णा भर रस्त्यात पडू लागले. भररस्त्यात दारू पिउन पडलेल्या अस्ताव्यस्त माणसाकडे आजकाल सवयीने दूर्लक्ष करतात, तसंच अण्णाकडे कुणी पहात नसे पण नंतर लोकांना माहिती झालं अण्णा चक्कर येऊन पडताहेत. मग माणूसकी न सोडलेला

एखादा माणूस अण्णांना घरी आणून सोडायचा.

या प्रकारानंतर रजनीबाईनी अण्णांचे हिंडणे-फिरणे बंद केले. आता मात्र आपण दुबळे झालोत या भावनेने अण्णा हबकलेहोते. वरच्या पट्टीतला त्यांचा आवाज कमी पट्टीचा झाला असे वाटू लागले. रजनीबाईंनी नेमकेपणाने कठोर वागण्याचे ठरवले त्यांनी अण्णासारख्या ‘बिमार वाघाला’ अधिक घायाळ केले. आपल्या नवऱ्याने कधी कुणाचा दुवा तर घेतला नाहीच उलट आपल्या हाताने लोकांचे संसार उध्वस्त झालेला पहाण्यात आसुरी आनंद मिळवला. त्या त्रासलेल्या जीवांचे तळतळाट लागलेच असतील ते भोग तर भोगायचे बाकीच आहेत अजून.अण्णांनी जे पेरलं – ते उगवलंच नव्हत.ते कसं असणार याचीच भिती रजनीबाईंना वाटत होती.

तशातच अण्णांची साठी उलटून गेली, त्यांच्या नजरेने दगा दिला. दुनियेला बनविणारा, झुलविणारा अण्णा नावाचा इरसाल गडी दिवसागणिक खंगू लागला. अशा अवस्थेतल्या अण्णांना पहाण्यासाठी लोक येतात, ते का येतात? याचे रजनीबाईंना आश्चर्य वाटत असे, कदाचित अण्णांची अवस्था अशीच झालेली पहावी ही लोकांच्या मनात दाबून ठेवलेली इच्छा असणार. अण्णांबद्दल वाईट वाटणाऱ्यां पेक्षा त्यांना आता भोगाव्या लागणाऱ्या यातना पाहून मनातून आनंद होणाऱ्यांची संख्या अधिक आहे हे जाणवून रजनीबाई खिन्न होत होत्या.

करावं तसं भरावं हा दुनियेचा शाश्वत नियम आहे. स्वत:च्या कैफात जगलेल्या अण्णांना याचा विसर पडलेला होता. वागण्याचा पश्चाताप होणे,केलेल्या चुकांची कबुली देणे म्हणजे स्वत:च्या पराभवाला मान्यता देणे होते – त्यामुळे सगळ्यांना अफाट आनंद होणार हे अण्णोंना चांगलेच माहिती होते. समोरच्यांना सुख द्यायचे नाही- आनंद द्यायचा नाही हे तर त्यांचा जीवनभराचा जपलेला मंत्र होता, आपण असेच जगलो – असेच मरायचे अण्णांचा निर्धार डळमळणारा नसतोच.

मग नंतरच्या दिवसात अण्णांनी सकाळ-संध्याकाळ तिन्ही-त्रिकाळ मोठमोठ्यांने जगाला शिव्या देण्याचा उद्योग सुरू केला. घशाला कोरड पडली तरी ते थांबत नसत. आपल्या तैनातीसाठी असलेल्या नर्सला त्रास देणे,रजनीबाईंना सतत खोलीत उभे करणे हे अण्णांनी सुरू केले. सगळ्यांचा त्रास अधिक वाढावा म्हणून अण्णांनी स्वत:ला एक दिवस पलंगावरून पाडून घेतले. डोक्याला मार लागला, कमरेला मुका मार लागला. एक ना दोन नव्या उपचारासाठी नवी योजना, सारे वैतागून गेले, हैराण होउन गेले.

अण्णांची वीलपॉवर मात्र जबरदस्त , इतके शारिरीक आघात होउन अण्णाची स्मृती ,वाणी खणखणीत आणि ठणठणीत. दुबळ्या झालेल्या काडीमात्र शरीरात साऱ्या जगाला शिव्या देत बसण्याची ताकद कशी येत असेल? याचेच सगळ्यांना आश्चर्य वाटत होते.हे सगळ थंडपणे पहाणाऱ्या रजनीबाई शांतपणे विचार करायच्या – दुसऱ्याच्या आयुष्याची राखरांगोळी पहाण्यात या माणसाने आनंद मिळवला . इतरांसारखे सरस रूप नाही, सरस गुण नाही याचे शल्य चिघळलेल्या जखमेसारखे चिघळू देत जन्मभर बोचते ठेवले त्यापायी नशिबाला देष दिला,जन्मदात्या आईचा दु:स्वास केला, तिला मन:स्तापाचे दु:ख दिले, भावंडाना दूर केले, बापाच्या मदतीने स्वत:च्याय घराची वाट लावली- हे सारे का आणि कशा साठी? स्वत:वर नाराजी! नशिबावरची नाराजी- त्याची इतकी कठोर शिक्षा इतरांना का दिली? आयुष्यात काय साधले अण्णांनी?
आणि आपला अपराध काय? ज्यामुळे ’अण्णांचा सहवास ही शिक्षा’ भोगावी लागते आहे. अण्णांशी झालेला विवाह, हा योग होता की नशिबाचा भोग?

स्वत:च्या हाताने आपलेच राज्य उध्वस्त: करणारा कफल्लक राजा म्हणजे अण्णा, आज पराभूत अवस्थेत आहे. तो हे मान्य करील? अण्णांच्या समोर बसलेल्या रजनीबाई नशिबाचा चुकलेला पाढा पुन्हा -पुन्हा वाचीत होत्या – हे आणखी किती दिवस?

# दुनिया झुकती है

टक्के टोणपे खात झगडणाऱ्या , अपयशी अरविंदाची चक्रावून टाकणारी कथा.

अरविंदाने असे वेदना देणारे अनेक टोमणे कसे खावे लागतात हे शांतपणे ऐकवले होते.विपरीत परिस्थितीतले जगणे निश्चयाला अधिक बळकटी देते. पडलेली स्वप्ने कशी पूर्ण करायची याची दिशा देखील मिळते.

# दुनिया झुकती है---

बापू आज वेळ आहे का? संध्याकाळी पाच वाजता नेहमीच्या ठिकाणी भेटू, महत्वाचं बोलायचं, नक्की या, मी वाट पाहीन,बाय

माझ्याशी संर्पक साधण्याचा अरविंदाचा हा दोन तीन दिवसातला सातवा-आठवा तरी फोन असेल खरच सांगायचं तर मला खरच वेळ नव्हता. घरातल्या कामांचे नियोजनच असे केले गेलेले होते की, संध्याकाळच्या वेळी तास- दोन तासांसाठी मी घराच्याबाहेर पडू शकत नव्हतो.

आता सांगण्यात संकोच तरी का करायचा? माझ्याकडे माझे थोरले काका खुप वर्षांपासूनचे होते. ही जबाबदारी टाळण्याचा प्रश्न नव्हता, कारण ते माझे वडिल होते- लौकिक अर्थांने त्यांनी माझ्या लहानपणीच मला दत्तक घेतले होते, तेव्हा पासून काका-काकूनी मला लहानाचे मोठे केले होते. त्यांच्याच घरात माझा संसार सुरू झाला. यथावकाश मी आजोबा तर काका पणजोबा अशी आमची नात्यातील बढतीही झालेली होती. माझे जन्मदाते आई-बाबा गावाकडेच असायचे. सणासुदीच्या निमित्ताने गावाकडे जाणे व्हायचे. एरवी फारसे नाही. असो.

तर माझ्या लौकिक वडिलांच्या सेवा कार्यासाठी चोवीस तास केअरटेकरची व्यवस्था होती, फक्त सकाळच्या काळजी वाहकाची वेळ संपायची, आणि दुसऱ्याची वेळ सुरू होण्यात दोन तासांचा अवधि असायचा, मग या महत्वाच्या वेळेत केवळ काकांच्यासाठी म्हणून त्यांच्या समोर बसून राहणे,हेच काम असे. बाकी नाही.

अरविंदाचा पुन्हा एक फोन आला, तेव्हा मात्र सुजाताने त्राग्याने म्हटले, अहो,एकदा भेटा ना तुमच्या भावाला, स्वत: रिकामटेकडा, जगाला ही उद्योग नाही असेच वाटतयं त्याला. उद्या दुपारी जाउन एकदाचे भेटून या . हजार -पाचशेला चूना लावल्यावर त्याला आणि तुम्हालाही बरे वाटेल. हे दहादा फोन करणं बरं नाही. मी म्हणते -अरविंदाने एवढी चिकाटी कामधंद्यात दाखवली असती तर ही वेळ आली नसती.

अरविंदाच्या आजच्या परिस्थितीवर इतक्या कडवटपणे बोलणारी अशी, माझी बायकोच असेल, असेही नव्हते. अरविंदाने स्वहस्ते ही परिस्थिती स्वत:वर ओढवून घेतली होती. गावाकडे तालुकापातळीवर- जिल्हापातळीवर बऱ्यापैकी गुत्तेदारी चालू असतांना त्याला मोठा गुत्तेदार होण्याची स्वप्ने पडू लागली. हजारो रूपयांच्या उलाढालीत रस वाटेनासा झाला, लाखोरूपयांची कामे शहरात आपलीच वाट पहात असावेत असा त्या भ्रम, त्याचा विश्वास अरविंदाला लहान गावं,छोटे लोक, हे सगळ युसलेस वाटू लागलं.

त्याची ही चलबिचल अवस्था लपूनही राहिली नव्हती. शहरात राहणारा मी, त्याच्यासाठी हक्काचा आणि घरचाच माणूस होतो अरविंदा माझा दूरचा चुलतभाऊ, पण आमच्या सगळ्यांचे नातेसंबंध अजून आधाराचे- विश्वासाचे होते. त्याच्याकडून तो माझा मोठाभाऊ असा परिचय सर्वांना करून देत असे. 'बापूसाहेब, अरविंदाचे भाऊ' अशी माझी ओळख एव्हाना अरविंदाच्या उद्योग परिसरात झालेली होती.

गावाकडे रस्ता दुरूस्तीची,सरकारी इमारतींच्या डागडूजींची कंत्राटे अरविंदाला विनासयास मिळायची, फारशी स्पर्धा न करता त्याचे टेंडर मंजूर व्हायचे. साध्या शब्दात सांगायचे तर अशा जीवघेण्या मंजूरीच्या खेळात,अरविंदाची कधी हार होत नसे,याचे कारण त्याचे सर्वांशी असणारे घरोब्याचे,जिव्हाळ्याचे,प्रेमाचे संबंधआणि त्याचे हे वागणे नाटकी,कृत्रिम किंवा स्वार्थापोटीचे आहे- असे मुळीच नाही, याची खात्री अरविंदाच्या सहवासातील साहेबलोकांची, इतर प्रतिस्पर्धी कंत्राटदारांना इतकेच नव्हे तर अरविंदाच्या कामाच्या साईटवर राबणाऱ्या मजुरांना देखील होती. अरविंदाच्या जीव लावणाऱ्या स्वभावाची वेळोवेळी प्रचिती येत असे.

'घसरले तिथं पसरले'- अशा ढिल्ल्या मन मोकळ्या स्वभावाच्या अरविंदाचे स्वत:चे जग असे मित्रांनी ,दोस्तांनी जवळच्या सोयऱ्याधायऱ्यांनी सदा गजबजून गेलेले असायचे. आम्ही उभयता जेव्हा गावाकडे जायचो त्यावेळी आमच्या सेवेची जबाबदारी अरविंदा अगदी हक्काने स्वत:कडे घ्यायचा. शहरात राहण्याऱ्या मोठ्या नोकरीत मोठ्या हुद्यावर असणाऱ्या सुजाता वहिनींचा त्याला फार अभिमान .या वहिनींचे स्टेटस आपल्या लहान गावात कसोशीने सांभाळीत असायचा. अरविंदाचे 'बापू' आले म्हणजे, आता अरविंदाला आमची गरज नाही,चला भेटू नंतर,असे म्हणून त्याचे मित्र तात्पुरते बाजूला होत.

एवढ सगळ अत्यंत व्यवस्थित आणि सुरळीत चालेलं असतांना, मध्येच अरविंदाला मोठ्ठं व्हायची स्वप्न पडू लागली. हाता असलेल्या कामाने तो खुष होईनासा झाला. या लहानश्या गावात सडत बसण्यात काय पडलय,बापू,मी तुमच्याकडे येत आहे.सांभाळून घ्या.अचानक बिथरल्या सारखं वागणाऱ्या अरविंदाचे निर्णय चुकू लागले, एका जागी चित्त स्थिर नाही, मन सदा असमाधानी, अशा अवस्थेत अरविंदाच्या चिमुकल्या जगात ही खळखळ होउ लागली. निलिमा, अरविंदाची बायको ,तिला माठ्या गावात,झगमगत्या वातावरणात राहण्याची मनापासून आवड,सोबत अरविंदाच्या दोन्ही मुलांनी आईच्या आवाजात भर घालीत चला,आपण सारेच एका ठिकाणी राहू, बाबा आमच करीअर तरी घडेल हेही कारण तस पटण्यासारखंच होतं.

साऱ्या जगावर प्रेम करण्याचा मक्ता घेतलेला अरविंदा आपल्या बायका पोरांना नाराज करणार नाही, याची आमच्यापासून सगळ्यांनाच खात्री होती. अरविंदाला आता गाव सोडण्याच्या निर्णयाने नव्या ठिकाणी जाण्याची खुपच उत्सुकता लागलेली होती. संबंधित अधिकाऱ्यांना विश्वासाने अरविंदाने आपले प्लॅन खूप उत्साहाने सांगीत,पुढच्या टेंडरमध्ये नसणार हे देखील सांगून टाकीत. हळूहळू आवरते घेण्यास सुरूवात केली.

इथचं,पहिल्यांदा अरविंदाच्या जंटलमन प्रतिमेस घक्का बसला. रोजच्या व्यवहारात पैशाची मदत करणाऱ्या जवळच्या मित्रांना त्याने पैशाच्या देवीघेवी वरून फटकारले,दुसऱ्याने बँकाचे व्यवहार अमान्य करीत, स्वत:रची आर्थिक जबाबदारी टाळीत अरविंदाने विपरीत परिस्थितीत आपल्या कर्मभूमीला कायमचा रामराम ठोकीत, एका नव्या पर्वाला अस्थिर परिस्थितीत आरंभ केला.

अरविंदाची माझी नव्या स्वरूपात पहिल्यांदा भेट झाली तेव्हा तो म्हणाला– बापू,मी तुमच्यापासून काही एक लपवणार नाही. आजची माझी परिस्थिती, गेल्या दिवसात माझ्यातील झालेल्या बदलामुळे, माझ्याबद्दल सगळयांचे फक्त आणि फक्त गैरसमजच झाले आहेत. हे मला ठाउक आहे. बापू, आपल्या सभोवतालच्या माणसांना सोयिस्करपणे फक्त गैरसमजच करून घेता येतात, बाकी खरे काय, हे जाणून घेण्याचे प्रयत्न कुणी करत नाही, याचेच वाईट वाटते, असो मी हे वागलो, माझ्या माणसांना दुखावलं, असं वागल्याशिवाय, ही प्रमाची माणसं दुर गेली नसती हो. अरविंदाचे हे वागणं अजब होत हेच खरं.

मी आणि अरविंदा, दोघंही अनेक वेळा भेटत राहिलो, अरविंदाने वन बीएचके –तसा लहानसा फ्लॅट घेतला होता.अरविंदाचा मूळ स्वभाव जागा झाला, आणि त्याचे हाऊस – गेस्ट हाऊस झाले कुणीही हक्काने यावे, खुशाल रहावे, आपले काम आटोपले की अरविंदाच्या पाठीवर आपलेपणाची शाबासकी दिली की पाहुणचार संपायचा. एवढ्याशा पाठबळावर अरविंदा समाधानाने राहतोय, ही गोष्ट सगळ्यांना खरीच वाटत नव्हती, याचेच मला आश्चर्यही वाटायचे आणि वाईट सुध्दा.

अरविंदा कामाच्या शोधात फिरत होता. पूर्वकार्याचा भरपूर अनुभव गाठीशी होता,मोठ्यांच्या ओळखी, शिफारशींची देखील कमतरता नव्हती. दिवसभर वणवण फिरणाऱ्या अरविंदाच्या चेहेऱ्यावर लाचारी,निराशा,नाउमेद हे भाव मला कधीच दिसत नव्हते. सदैव उत्साहाने,मोठ्या उमेदीने,गाढ विश्वासाने बाहेर वावरणाऱ्या अरविंदाबद्दल सुजाता आश्चर्याने म्हणायची सुध्दा ' कमाल आहे बाई या माणसाची ,एवढा कॉन्फिडन्स कसा काय?' कळतच नाही. गावाकडे किती छान चालायच यांचं! आता इथं बिनकामाचं दिवसभर घरात बसून राहणं, मी तर या अवस्थेची कल्पनाच करू शकत नाही बाई.

बाकी, अरविंदाच्या डेअरिंगची प्रशंसा करणाऱ्यांची संख्या तशी कमीच असायची, उलट एखाद्या कार्यप्रसंगाच्या निमित्ताने आम्ही कुठं एकत्र आलोत तर, तिथं जमलेले सारेजण हितचिंतकच ? आहेत याची खात्री नसायची. पण हळू आवाजात चाललेली कुजबुज नव्याने आलेल्या अरविंदाबद्दल,त्याच्या रिकामटेकडेपणाबद्दलची असते, याची आता सवय करून घ्यावी लागणार, असे अरविदा उसन्या उत्साहाने भरलेल्या आवाजात कबूल करीत सांगायचा.

उठसूठ एखाद्याला उपदेशाचे डोस पाजत बसणे, जीवनभराचे तत्वज्ञान सांगत बसणे या गोष्टीच्या कंटाळवाण्या रतीबापासून 'बापू' दूरच असतात हे अरविंदाच्या आणि त्याच्या बायको–मुलांच्या लक्षात आल्यामुळे, ते माझ्या येण्याने अवघडून जात नाहीत हे माझ्या जाणीवेत पक्के बसल्याने, माझ्या आग्रहाने सुजाता देखील अरविंदाच्या घरी येण्यास फारशी खळखळ करीत नाही, याचा मला आनंद होता, आणि आम्ही उभयंता आवर्जून येत असतो या गोष्टीचे अरविंदाला मानसिक समाधान मिळते. हे मी लक्षात ठेवून होतो.

जगाची काळजी घेणारा अरविंदा व्यवहारात अगदी काटेकोर आणि दक्ष होता. आपल्या मित्र परिवारातील प्रत्येकाच्या आनंदाच्या प्रसंगी तो पुढे असायचाच,पण संकटांच्या प्रसंगी, दु:खाच्या प्रसंगी, आधारासाठी, मदतीसाठी अरविंदा नक्की असणार याची प्रत्येकाला खात्री असे. माझ्या मते तर या चांगल्या गोष्टी करीत राहण्याचा ध्यास ही अरविंदाची वीलपॉवर आहे. अशा गोष्टीत मन गुंतत राहिल्यामुळे स्वत:ला आलेल्या टेंपररी नाकर्तेपणाचे टेन्शन तो सहन करू शकत असेल.

आपली सत्कर्मे आपल्याला सावलीसारखी साथ देतात,अरविंदाच्या बाबतीत हे खरे आहे. वास्तविक पैशांच्या तालावर चालणाऱ्या कठोर दुनियेत, पैसा नसलेल्या, काम नसलेल्या माणसाकडे ढुंकून पाहिले जात नाही. पण अशा अवस्थेत तडफदारपणे,बाणेदारपणाने,सचोटीने राहणाऱ्या ,राहु पाहणाऱ्या अरविंदाचे जगणे मला तरी आश्यर्चकारक असा चमत्कार वाटे.

माझे मत काही असो, अरविंदाबद्दल त्याचे बापू चांगले बोलणार,तो त्यांचा फेवरिट ना बाबा, अरविंदाबद्दल आम्ही काही वाईट सांगितले तर, बापू थोडेच विश्वास ठेवणारेत? आणि अशा बोलणाऱ्यांकडे दूर्लक्ष करणेही बरोबर नसेल, कदाचित, अरविंदाचे कुणाशी पटत नसेल,कुण्णाबरोबर व्यवहार फिसकटले असतील ही,पण या गोष्टी बाहेर जेव्हा बोलल्या जातात त्यावेळी सांगणारा प्रत्येकजण स्वत:च्या सोयीने,स्वत:ला सोयिस्कर अशाचा शब्दांत सांगणार ,मग अशा चूक,फसव्या,गैरसमज करणाऱ्यां शब्दांचे प्रहार मानसिक वेदना देणारे असतात.

अरविंदाने अनेक वेळा असे वेदना देणारे टोमणे कसे खावे लागतत हे मोठ्या शांतपणे ऐकवले होते. विपरीत परिस्थितीतले जगणे माणसाच्या निश्चयाला अधिक बळकटी देते त्याच्या उमेदीला अधिक बळ देते,पडलेली स्वप्ने पूर्ण कशी करायची याची दिशा देखील मिळते, म्हणूनच एखादा उध्वस्त झालेला,आत्मविश्वास हरवून बसलेला, मनगटातली शक्ती घालवून बसलेला,गैरसमजाचा बळी ठरलेला, चूकीच्या निर्णयाचा शिकार झालेला, असा कुणीही एखाद्याच्या अचानक भेटींने,स्पर्शाने,समजावणीने संजीवनी मिळाल्यासारखा नवचैतन्याने पुन्हा उभारतो,आकारतो,साकारतो तेव्हा आयुष्यात येणाऱ्या त्या अनामिकाला देवदूत म्हणावे .

होय, 'असाच एक देवदूत' अरविंदाच्या आयुष्यात आला. एक मोठा प्रतिष्ठीत उद्योगपती, अरविंदाच्या एका जिवलग मित्राच्या व्यवसायातील विश्वासू भागीदार. या मित्राच्या मदतीने राज्यभरातील उद्योगसाखळीच्या नव्या इमारती,गृहवसाहतीची कंत्राटे पूर्ण करण्याची जबाबदारी टाकण्यासाठी योग्य आणि लायक माणूस म्हणून अरविंदाची निवड केली गेली.

ही बातमी मला सांगण्यासाठीच अरविंदा मला फोन करून पुन्हा पुन्हा बोलवत होता. दुसरे दिवशी सुजाताला ही नवी कहाणी सांगीतली– माझ्या अपेक्षेप्रमाणे ती म्हणाली– मी खंर सांगते, या माणसाबद्दल मी फारशी उत्सुक नव्हते, हातातले सोडून पळत्याच्या मागं पळणारी माणसं मला आवडंत नाही पण बापूसाहेब, तुमच्या अरविंदानं मला नव्याने विचार करण्यास भाग पाडले हे मी कबूल करते. त्यांच अभिनंदन केलं म्हणून सांगा.

हे ऐकून अरविंदा इतकाच मला आनंद झालायं हे मलाही जाणवत होते. संध्याकाळी ठरल्याप्रमाणे मी आणि अरविंदा मस्त भेटलो, खुप बोललो. अरविंदा म्हणाला– बापू,आशिर्वाद दया ,नव्या पर्वाला सुरूवात करतोय. खूप मोठ्ठ काम आहे,स्वप्नात पाहिलं होतं एवढं त्यासाठी धीर दया,आधार दया.

सर्वांचा भक्कम आधार प्रेम मिळवलेल्या अरविंदाला कधीच कशाची चिंता नव्हती,पण मधल्या बिनकामाच्या बिनपैशाच्या अरविंदाला जरा वाईट दिवस आले होते हे ही खरेच होते. पण पठ्ठ्या डगमगला नाही. दुनियेसमोर तेवढाच ताठ उभा आहे. याचा मला खुप अभिमान वाटतो. मी म्हणालो,

अरविंदा – दुनिया झुकती है --

लेकिन उसको ----------

# सहजीवनातील मधुर संगीत

सहजीवनातील मधुर संगीत अनुभवायचं तर समीहन-समीधासारखं समजूतदार व्हायला हवं. एका कथेच्या माध्यमातून मिळणारा संदेश.

समीहनला वाटायचे " ऑफ़िसमधून घरी आल्यावर मस्त आराम करायचा. रात्रीच्या मस्त वेळी गिटारवर समीधाला आवडणारी धून सजवायची. कधी एखादे जुने नवे गीत नव्याने बसवायचे. वगैरे वगैरे. नेमक्या या स्वप्नाला जमिनीवर आणायचे रूक्ष काम समीधा अगदी कोरड्या मनाने करते आहे---

# सहजीवनातील मधुर संगीत

गेल्या आठवडयातील पाच दिवसात समीहनने पंधरावेळा फोन करून,‘काका,एकदा भेटायचे आहे, बोलायचे आहे तुमच्याशी आणि खुप महत्वाचे पण आहे हे. केव्हा येऊ?’

एकदा तरी त्यांच्या या फोनचे उत्तर मला ‘होय, ये एकदा तू’ असे देणे अपेक्षित होते, पण का कुणार ठाउक,समीहन, तू ये, असे काही मी बोलून दाखवत नव्हतो. माझ्या मते तर, खूप महत्वाचे असे बोलण्यासारखे त्याच्याकडे काहीच नसणार,उगीच फुगे फुगवून,हवा सोडत रहाण्याची त्याची खोडकर सवय, सगळ्यांच्या परिचयाची होती.

खरं म्हणजे, समीहन आणि त्याची बायको समीधा- दोघेही आमच्या परिवारातील एक जोडपे. लग्नाला अवघी दोन वर्षे झालेली. नव्या नवलाईचे दिवस अजूनही रेशमी दुलई सारखे लपेटून रहाण्याचे दिवस असतांना, अलीकडच्या भेटीत, का उगीचच बेसूर सूर आळवत असतो? हा प्रश्न आम्हाला कोड्यात टाकणारा ठरत होता.

एकमेकांच्या प्रेमात आखंड बुडून, होश आल्यावर लग्नाच्या बेडीत अडकून घेण्याऱ्या अनेक प्रेमी युगुलात आम्ही समीहन आणि समीधाचा समावेश करीत होतो. रसिक स्वभावाचे, खेळकर मनोवृत्तीचे हे दोघे परस्परांच्या प्रेमात पडले नसते तरच आश्चर्याचे होते. मन जुळण्यासाठी ज्या काही आकर्षणाच्या गोष्टी तरूण मनांना भावणाऱ्या असतात. ते घिसेपिटे फारमुले समीहनने वापरले असतीलच, आणि समीधाने हसरे प्रतिसाद नक्कीच दिले असतील, हे आमचे अंदाज खरे ठरले, कारण त्यांच लग्न झाल्यानंतरच्या दिवसात त्यांचे एकमेकांचे कौतुक किस्से,खुद्द समीहन आणि समीधा सांगु लागले, तेव्हा या जोडीच्या चेहेऱ्यावरचे समाधान, आणि आनंदाचे, कौतुकाचे गुलाबी रंग पाहून, यांचे सहजीवन छान फुलते आहे,खुलते आहे, ही आमच्या सर्वांच्यासाठी मोठी समाधानाची बाब ठरत होती.

व्यावहारिक जगात वावरतांना अर्थिक बाबींच्या बाबतीत खुप मोठ सांसरिक कसरत करावी लागत असते. सगळ्या गोष्टींचे सोंग करता येते- पैशांचे मात्र सोंग करणे कठीण असते. या महत्वाच्या गोष्टींचे भान समीहन-समीधाने उत्तम तऱ्हेने सांभाळून ठेवलेले आहे हे पाहून - समीधाचे आई-बाबा आणि समीहनचे आई-बाबा , ही जेष्ठ मंडळी देखील सुखावली होती.

अलीकडच्या दिवसात, नोकरीच्या रूपाने अनेक ताण-तणाव घराघरात थैमान घालू लागले आहेत. बारा-पंधरा तासांच्या ड्युटी कल्चरमुळे शारिरीक आणि मानसिक अशा दोन्ही अवस्थेने पिचून जाणाऱ्या तरूणांपैकी एक समीधन आणि समीधा असणे अगदी कॉमन होते. आपल्या - आपल्या ऑफिसातून घरी आल्यावरच्या प्रत्येक रात्रीच्या वेळेने, या जोडप्याच्या मानसिक स्वास्थ्यावर आणि आनंदावर विरजण पडण्यास सुरूवात झाली,आणि मला जाणवले, समीहन या फटक्याने खुप निराश झाला आहे. एकुणच या परिस्थितीला समधा जबाबदार आहे, असे समीहन म्हणूच शकत नव्हाता. ‘परिस्थितीच या परिस्थितीला जबाबदार आहे- समीहन असे एकदा मी त्याला बोलून गेला - तेंव्हा ‘तुमचं काय काका! तुमची नोकरी- साडेदहा ते साडेपाच, ते ही छोट्या -छोट्या गावात राहून नोकरी, ‘इकडे साहेब- तिकडे साहेब, बाजारात साहेब, मज्जा केली तुम्ही, बाबांनी सुध्दा!

काका, आमच्या सारखी नोकरी करून दाखवा, मग मानतो तुम्हाला अहो , अजून चाळीशी गाठली नाही तर, मुक्कामाला आल्यासारखं वाटतय मला!

ऐ,सम्या काही काय बोलतोस रे? कशाला काय अन फाटक्यात पाय मी बोललो त्यावर समीहन म्हणाला-

काका, तुम्ही लेख लिहिता, गोष्टी आणि कविता लिहीता- केव्हा? तर तुमचं पोट आणि मनं दोन्ही काठोकाठ भरलय म्हणून, बरोबर की चूक?

समीहनच्या प्रश्नांने अनेक प्रश्न उभे केले. कारण गेल्या वर्षभरात समीहन-समीधाच्या राजा-राणीख्या सुखी संसारात ‘सानिध्य’ या युवराजाचे गोड आगमन झाले होते. आई झालेली समिधा , नव्या सुखद जबाबदारीत मनापासून रमली. दुप्पट उत्साहाने ती नवऱ्याचे,तिचे आणि इवल्याशा बाळाचे सारे काही अगदी आनंदाने आणि मनापासून करीत असते, शेवटी प्रत्येक गोष्टीच्या उत्साहाला थकावट ही दुसरी बाजु असते. हे तिच्या जरा उशिराच लक्षात आले, आणि बाबाकडून- समीहनकडून‘जरा सानिध्याला घ्या,त्याला खेळवा, बघा-बघा तो पडेल, लक्ष कुठयं तुमच?

या अपेक्षा व्यक्त होऊ लागल्या आणि हा समीहन नंबर एकचा छंदिष्ट आणि नादिष्ट ,आमच्याकडून अजुनही त्याचेच

कौतुक शब्द ऐकण्याच्या सवय न गेलेला हा तरूण 'बाबा' या नवीन जाबाबदारी घेण्याच्या समंजसस्थितीत येण्यास वेळ घेउ लागला.

समीहनला वाटायचे,ऑफिसमधून आलं की, मस्त आराम करायचा रात्रीच्या निवांत वेळी त्याच्या आवडत्या गिटारवर समीधाचे आवडते गाणे वाजवून दाखवायचे, कधी-कधी एखादे जुने-पुराणे गीत बसवायचे वगैरे-वगैरे

नेमक्या या स्वप्नाला जमीनीवर आणण्याचे रूक्ष काम, अगदी कोरड्या मनाने समीधा करते आहे - अशी कल्पना- स्वत:च्या मनाशी समीहनने केली असावी' - असे ही मी एकदा बोलून दाखवले तो म्हणाला-

हे बरय तुम्हा मंडळींचा, माझी प्रत्येक गोष्ट हसण्यावारी नेण्याची तुमची सवय मला आवडत नाही. मी घरी आलो की, आराम तर बाजुलाच, बाबा , हे करा बर, बाबा हे कर बर - 'सानिध्यला' अजून 'बाबा' म्हणण्याला वेळ आहे, पण त्याच्या आईनेच माझा 'अहो ,बाबा करून टाकलाय सांगा आता काय म्हणता यावर?

समीहनचा स्वभावं पहाता- हा खरचं वैतागाने म्हणतोय? की - नवरा- बायकोच्या प्रश्नांची फिरकी घेउन, आम्हाला काय वाटते? म्हणून आम्हाला'बकरा' बनवतोय कळत नसायचे. पण अलीकडच्या त्याच्या महत्वाचे बोलायचे आहे, एकदा येउ का? अशा फोनने आमचा मानसिक गोघळ जरूर वाढत होता. त्यामुळे तो आलाच तर काय बोलायचे - सांगायचे याचाच मी विचार करू लागलो होतो.

आपल्याकडील कुटुंबव्यवस्थेमध्ये, 'विवाह' ,'विवाह संस्कार' आणि 'विवाहसंस्था' , या सर्वांना भावनिक- सांस्कृतिक,सामाजिक अशा महत्वाचे संदर्भ आहेत. 'सहजीवन आणि समुहजीवन' या दोन्हींचे स्थान माणसाच्या व्यक्तिगत जीवनात, आणि सामाजिक आयुष्यात खुप महत्वाचे आहे.

सुखी आणि समृध्द जीवनाचा आधारपाया 'परस्पर सामंजस्यावर' आधारित असावा लागतो. व्यक्तिगत अंहतेच्या आहारी जाउन,एखादी व्यक्ती स्वत:बद्दल भलत्या भ्रामक कल्पना करून घेतो, 'इतर सर्वांनी त्या कल्पना मान्य करायलाच हव्या असा दुराग्रह धरून वागतो,

अशा जोडप्याचे संसार- आरंभाचे, असो व सरावलेले असोत त्यांना विसंवादाची काळी किनार लागते. असंमजपणा त्यामुळे दोघांच्या मनाला - आधार कोण देणार? कसा आणि कधी देणार?

'सारासार विचार करून जो करावयाचा असतो त्याला संसार करणे असे म्हणतात. आणि संसार फक्त नवरा-बायकोचा नसतो, त्यात सगळ्यांचा सहभाग असतो. याच विसर ज्यांना पडत नाही, त्या परिपक्व जोडप्यांचा संसार,प्रपंच म्हणून सर्वांना हवाहवासा ठरणारा असतो.

सौहार्द,सहानभुती,आपुलकी,जिव्हाळा,काळजी, या सर्वाच्या आत परस्परांबद्दलची असते,'प्रेमभावना' या भावनांची जपणूक करणाऱ्या जोडप्यांच्या सहजीवनात एक निर्मळ असा आनंद भरभरून वाटणार हे नक्की

हे सारं पुस्तकी ज्ञान आहे, असे नाही. 'स्वानुभवातुन, हे सगळं सभोवारातून अनुभवता येईल.' आपल्या बाजुला जितकं वाईट आहे, 'त्यापेक्षा मंगलमय आणि जीवनदायी असं खुप अधिक आहे.' यावर विश्वास ठेवता येतो.

नवऱ्याने आपल्या स्वभावात बदल केलाच पाहिजे,आवडीत बदल करण्याची तयारी ठेवली पाहिजे. एकट्या बायकोनेच बदलले पाहिजे हा अतिरेकी अट्टाहास का बर? जोडप्यातील दोघांनीही आपापल्या स्वभावातील ताठरपणा सोडण्याची तयारी जितकी लवकर सुरू केली तर, विसंवादी संवादांच्या फैरी झडणार नाही.

मनाचा मोठेपणा नेहमी दुसऱ्यांच्याकडून अपेक्षिला जातो. स्वत:च्या मनाच्या सुकुचितपणामुळे काय-काय प्रश्न निर्माण होतात? याची जाणीव हाउन, त्या प्रकारे बदलणाऱ्या जोडप्यांच्या उच्चारलेल्या शब्दांचे,आणि वाक्यांचे अनर्थ होण्याचे टाळण्यास त्रास होणार नाही, हे लक्षात ठेवलेच पाहिजे.

या साऱ्या गोष्टींची एक वेळ असते, ती वेळेवर केली तर त्याला काही अर्थ असेल. हे न ओळखणाऱ्याला वेळ हातून निघुन गेल्यावर आपले माणुस दुखावल्याचे आणि दुरावल्याचे दु:ख सहन करावे लागते.

एकमेकासह सोबतीचे जीवन म्हणजेच 'सहजीवन' त्यात एकमेकांना वजा करून चालणार नाही. एकमेकाशिवाय अपूर्ण -त्यांना 'नवरा-बायको' 'पती-पत्नी' हे सार्थ नाव मिळतच नाही. एकट्याचे जीवन- सहजीवन कसे?

हुश्श! एवढे सारे सुविचार - समीहन-समीधाला सांगायचे, असे मी ठरवले, खुप बरे वाटले, स्वत:चेही निरीक्षण करून पाहिले, मी माझे जीवन,'सहजीवन जगत आलोय'- याचे समाधान मनाशी साठवले, ही भावना सुखद वाटत होती.

जोडीदाराची कदर करावी, त्याच्या भावनाचा आदर केला पाहिजे, स्वत:कडे प्रसंगी कमीपणा घेउन ,दुसऱ्याच्या मोठेपणा मान्य केला तर अहंकाराचे द्वंद्व टाळता येते.

माझ्या विचारांना ब्रेक लावावा लागला. दरवाज्यावरील बेल वाजली. मी दरवाजा उघडला, समोर समीधा तिचे गोडगोजरे साजरे बाळ,सानिध्य – आणि या दोघांचा आधार – माझा बेस्ट फ्रेन्ड – समीहन उभे होते.

खुर्चीवर बसरत समीहनने आत आवाज देत म्हटले, मीनाक्षी देशपांडेकाकू,मी ठेचा–भाकरी खाण्यासाठी आलोय, जेवणार आहोत आम्ही. समीहनच्या बोलण्याच्या स्टाईलवर समीधा कृतककोपाने म्हणाली–बघा काका, हे असं वागत असतो. त्याला बाळ झालंय तरी, याच्यातल बाळं अजून मोठं झालं नाही.

त्यावर समीहन म्हणाला – काका, हिच हे असं सारख सुचना करणं वाढतच चाललंय बघा म्हणून, मी ठरवलयं, तुम्ही मागच्या वेळी म्हणालात तस्सचं वागायच यापुढे––

समीधा आश्चर्याने म्हणाली म्हणजे? काय करणार तू?

हे बघा , मी घरी असलो की, पूर्ण काळजीने सानिध्याला सांभाळणार,माझी गिटार, हे बाळ मोठ्ठा होईपर्येंत उंच ठेउन देणार, माझी आवड काय, ती केंव्हाही पूर्ण होईल.

हा सानिध्य पून्हा लहान थोडाच होणारेय? आणि हो, समीधा, तुला ‘हे कर, ते करतोस का? असे सांगण्याची वेळ येणार नाही कारण ‘मी एक ‘होयबा नवरा होणार’ समीधा हे तर तुला चालेल ना.

माझ्याकडे बघत ती म्हणाली– बघा तुम्ही आणि सांगा काका, मी या महाशयांना काय बोलणार? कुठून बोलले असं करतो हा. हे बघा,समीहन आणि समीधा तुम्ही दोघेही समंजस आहात,भांडखोर नाहीत – हे मला माहिती आहेच. त्यामुळे सहजीवनाबद्दल मी तुमचे बौदिक घ्यावे असे नाही, हा सम्याच जरा बदमाश आहे. उगीच परेशान करीत असतो सगळ्यांना.

समीहन आणि समीधा दोघेही खरोखरच एक गुणी जोडंप, समंजस–सुखी–समाधानी . दोघांच्याही आई–बाबांना आमच्या सारख्या स्नेहीजनांना आनंद देणारी युगलजोडी, त्यांच्या सहजीवनाचे गीत असेच मधूरसंगीताने बहरत रहावे, हीच इच्छा!

# आपण बदलायला हवं

पती आणि पत्नीच्या नात्यांवर इतर अनेक नात्यांची आणि जबाबदाऱ्यांची राख जमायला लागते तेव्हा...

> तू उत्तम सून झालीस, बेस्ट गृहिणी झालीस, काळजीवाहू आई झालीस. जावयाची आदरणीय सासू झालीस, सूनेसाठी सासू आई झालीस. भारती, एवढ्या व्यस्त वेळापत्रकात , भास्करची बायको, भारती कुठे हरवून गेली ? सांगशील का?
>
> भ्रामक समजूतीत रहायची सवय तुला, तुला तुझ्या आत्मविश्वासामुळे लागली. हा तुझा आत्मविश्वास मी तुझ्यावर दाखवलेल्या पूर्ण विश्वासानेच निर्माण झाला हे विसरू नकोस भारती.

# आपण बदलायला हवं

हे पहा, मी आज अगदी हात जोडून सांगते, तुम्ही जरा भान ठेवा, आपल्याला बदलायला हवं, तुमच्या लक्षात कसं येत नाही?

बायकोची ही विनवणी – कम – ऑर्डर या कानाने ऐकून त्या कानाने ऐकून सोडून द्यायची सवय – सहजासहजी सोडून देणे शक्य नव्हते. त्यामुळे भास्कर अगदी निर्विकार चेहरा ठेवून भारतीचे बोलणे ऐकत होता. नवऱ्याच्या मख्ख चेहेऱ्याकडे पाहण्याची भारतीला सवय होती,पण रटाळ आणि कंटाळवाण्या सवयी कधी-कधी रागाचा पारा अधिक वाढवण्यास कारणीभूत होतात.

भारतीला आलेला राग अगदी स्वाभाविक आहे अशी तिची समजूत होती अगदी चुकीचेच आहे, अशी ही परिस्थिती नव्हती भास्करचे वागणे अगदी तऱ्हेवाईकपणाचे झाले आहे हे भारतीला जाणवत होते, शिवाय या विचित्र वागण्याचा सर्वात जास्त फटका भारतीलाच बसत होता.

सहा महिने झाले असतील, भास्करने नोकरीतल्या टेन्शनला कंटाळून व्ही आर एस घ्यायचे ठरवले. त्याचा हा निर्णय इतरांना म्हणजे भारतीला, – मुलाला,सूनबाईला, यांना मान्य असणार आहे, हे गृहीत धरून भास्करने आपला स्वत:चा निर्णय अंमलात आणला. नव्याचे दिवस सरले. सामान्य परिस्थितीचा दिनक्रम वाट्याला आल्यावर- मात्र भास्कर खडबडून जागा झाला. 'मुलाकडे काही दिवसच राहीन, नंतर परत जाउया आपल्या घरी- आपल्या गावाकडे, असा न लिहलेलो करारनामा दिवसातून दहादा भारतीला ऐकवू लागला.

रोजचेच बोलणे – हळूचं गाऱ्हाणे झाले, संवाद-विसंवादी होउ लागले. भारतीला वाटायचे, इतके दिवस झाले,स्वत:ची टिमकी वाजवणाऱ्या भास्करने,आरामशीर वेळापत्रक आखावे, भारतीची कामे न वाढवता, ती कमी होतील याची तरी काळजी घ्यावी. पण तसे होत नसायचे. नोकरीवर जाणाऱ्या मुलासाठी, सूनबाईसाठी भारतीची सकाळची वेळ लगबगीचीच जायची.सकाळचे दोन तास धावपळीचे, ते निस्तरले की मग रिकामा दिवस अंगावर घेत वेळ काढायचा. भास्करच्या घड्याळात सगळ्यात अगोदर सकाळ व्हायची, आणि कर्णकर्कश आवाजातल्या जाहिराती ऐकणे एकवेळ परवडले, पण भास्करच्या तूणतूणे वाजवण्याच्या स्टाईलचे एकच एक गाणे सुरू झाले की , अशी सकाळ का झाली? अशा वैतागाने भारती हैराण होउन जायची.

सूनबाई सकाळच्या घाई-गर्दीत स्वयंपाक करणे, डबेभरून घेणे अशा कामात असतांना, भारती तिच्या आवतीभवती काय हवे ते देण्यास तत्परतेने उभी असायची, नेमक्या अशा घाई-गर्दीत भास्करला वाटायचे- बाहेरच्या खोलीच्या गॅलरीत बसून, पहिला चहा घेत भारतीने निवांत बसावे.

भारतीच्या दृष्टीने ' हा निव्वळ पोरकटपणा दिसतो' भास्करने त्याला जे काही वाटतं ते त्रागा न करता, नंतर सांगाव, पण तसं होत नसायचं, लहान मुलं वेळकाळं न पाहता रूसून बसतात, फुरगुटून बसतात, त्यांचा हा बालहट्ट कौतुकाने पुरवला जातो, पण भास्करचे रूसून बसणे म्हणजे हटवादी-स्वभावाचा भाग, – मनात आलं तसेच वागणार- हमारा घोडा अैसाच चलेगा' हे काय वय आहे भास्करचं?

भारतीने मन:पूर्वक निग्रहाने भास्करच्या अशा वागण्याकडे दूर्लक्ष करण्याचे ठरवले आणि लहरी हवामाना प्रमाणे भास्करचे तापमान जास्त डिग्रीचे होऊ लागले. दिवसभर मग दोघांची कट्टी फू , दोन खोल्यात धुम्मपणे बसून राहणे असे प्रकार सुरू झाले. भास्करच्या वागण्याचे प्रकार पोरांच्या दृष्टीस पडू नये यासाठी भारती अटोकाट प्रयत्न करीत होती. पण कधी कधी हे प्रयत्न अपुरे पहायचे आणि पोरांच्या देखत भास्करचे टोमणे भारतीला मुकाटपणे ऐकून घ्यावे लागायचे. लोकेश आणि ज्योती दोघांना हे समजतही असेल, पण आम्हाला काहीच कळलं नाही असं शहाणपणाचं त्याचं वावरण भारतीला अवघडून टाकायचं

एक दिवस नेहेमीप्रमाणे सकाळच्या चहाची भट्टी बिघडल्याचे कारण भास्करची तबियत तिघडवण्यास पुरेसे झाले. ज्योती आणि लोकेश घराच्या बाहेर पडण्याचा अवकाश- त्याची मशीनगन धाड्धाड सुरू झाली.

भारती, आपलं लग्न झाल्यापासून मी पहातोय, काळजी घेण्याच्या तुझ्या यादीत माझा नंबर कायम शेवटून पहिला रहात आलाय. नोकरीत असतांनाच्या दिवसात- पोरं लहान,त्यांची काळजी,मोठी झाली-त्यांच्या लग्नाची काळजी, लग्नं झाली,

त्यांच्या संसाराची काळजी, संसार सुरू झाले, आता त्यांच्या प्रपंचाची त्यांच्या पोरा-बाळांच्या काळजीत , तुला चोवीस तासांचा दिवस सुध्दा कमी पडतोय.

तू उत्तम सून झालीस, बेस्ट गृहिणी झालीस, काळजीवाहू आई झालीस, जावयाची आदरणीय सासू झालीस,सूनबाईसाठी सासू आई झालीस, भारती,एवढ्या व्यस्त पत्रकात भास्करची बायको- भारती कुठे हरवून गेली? सांगशील का?

कधी याचा विचार तरी करून पहाण्याचं तू ठरवावसं असं वाटतं कारण अगोदर तू मनात ठरवतेस, आणि नंतर तसं वागतेस- या कठोर वागण्यात तुझ्याकडून नवऱ्याची काळजी घेणारी,नवऱ्याच्या आवडीचा विचार करणारी, करू शकणारी भारती दिसु शकली नाही, मग माझा अपेक्षाभंग का होऊ नये? भारती,'खुप चांगलचं ऐकून घेण्याची सवय घातक असते.'

भ्रामक समजूतीत रहाण्याची सवय, तुला तुझ्या आत्मविश्वासाने बहाल केलीय. हा आत्मविश्वास तुझ्यात आला, तो मी तुझ्यावर दाखवलेल्या विश्वासामुळेच ना! तुझ्या क्षमतेची जाणीव तुला करून देणे, ह्याप्रमाणे वागण्याचे स्वातंत्र्य देणे, ही माझी चूक ठरवण्याची वेळ, हल्ली तू वेळोवेळी माझ्यावर आणतेस.

भारती, व्हीआरएस मी माझ्या आनंदासाठी,स्वार्थीपणाने घेतलेला निर्णय नव्हता, तणावरहित जगण्याचा बोनस मिळाल्याचा आनंद माझ्या इतकाच तुलाही मिळाला हवा, असे मला वाटते. पोरा-पोरींना स्वतंत्रपणाने पडतझडत, टक्केटोणपे खात,संसार करू दिला पाहिजे असे माझे स्पष्ट मत आहे.आणि आपण आईबाप पोरांना त्यांच्या लहानपणी अगोदर औषधाचे डोस देतो,तरूणपणी वळणाने चालावेयाचा उपदेश करतो,संसार झाल्यावर पदोपदी' हे करू नका - ते करू नका 'हे केलसंका, का नाही केलसं? असे बुस्टर डोस न चुकता, न कंटाळता देतच असतो. इतकी उबग आणणारी माया, काळजी, धीरानेवागणाऱ्या ,समंजसपणे वागणाऱ्या पोरांना कंटाळवाणी वाटते,हे आपल्या का बरं लक्षात येत नाही? उलटबोलून ती आपल्या आईबापांचा अपमान करीत नाहीत, या गोष्टीतून आपण काही शिकले पाहिजे. भारती, आपण किनारा गाठण्याच्या तयारीतील प्रवासी आहोत, आपण सुखाचा,समाधानाचा किनारा गाठल्याचा आनंद मिळवायचा की, काल्पनिक भिती,अगम्य शंका-कुशंका या चक्रात अडकून पडून इतरांना हैराण करायचे.

भारती, आपण बदलायला हवे आहे, माझ्या अपेक्षा अवास्तव नसाव्यात,तू बायको आहेस, सखी व्हावीस,जाणती प्रेयसी व्हावीस असं वाटण्यात चूक ते काय? तुला वाटतं आपल्या भावनांचा कोंडमारा करीत जगणे म्हणजे- त्यागीवृत्ती, हे इतकं सापं नसतं बाई आपल्याला खुप जगायचयं, आनंदात जगायचयं, आपल्या पोरांसाठी , आणि आपल्यासाठी, फक्त दोघांसाठी सुध्दा हे लक्षात घ्यावस अशी माफक इच्छा

कोंडलेल्या वाफेच्या कूकरची जशी अवस्था होते, तशी अवस्था या क्षणी भास्करच्या मनाची झालेली असावी, दोन-चार शिट्ट्या झाल्यावर मोकळे वाटावे, तसा भास्कर उठला आणि भारतीकडे न बघता, एक शब्द ही न बोलता,बाहेर निघून गेला. पण तो रागारागात गेला आहे असे नव्हते उलट जे बोलून टाकावं असं मनात खदखदंत होतं, ते मोकळेपणाने व्यक्त झालं, याचं हलकेपण त्याला नक्कीच वाटत असणार. सुरवातीला क्षणभर भारतीला,भास्करचा आवेश ,बोलण्यातला आवेग नकोसा वाटला, शेवटी आपलं नातं-'पुरूष-स्त्री'या 'निदानरेषेवरचं' ठप्प झालंय असं भास्करला वाटतंय,इतके दिवस भास्करच्या संतापाच, असंतोषाचं हेच एकमेव कारण असावं, हे समजण्यात आपली चूकच झाली, हे मान्य करण्यात कमीपणा वाटायला नको.

एका दृष्टीने भास्करचचं बरोबर ठरावं- अशी परिस्थिती भास्करानेच निर्माण करून ठेवली, कर्तत्ववान गृहिणी,कर्तबगार आई,स्वयंफूर्त-स्वावलंबी-घरवाली- या पदव्या मिळवण्याच्या आनंदात भास्करला नकळतपणे दुरूयम ठरवत आलो-यशाची नशा केव्हांही वाईटच. मोठेपणा -भास्करचा-त्याच्या मनाचा, हे लक्षात ठेवण आपल्याला जमलंच नाही. नोकरीच्या व्यापात,पुढे जाण्याच्या ध्यासात- भास्करने फारशी आग्रही भुमिका कधी घेतली नव्हती,त्याचे प्रोत्साहन,त्याचे उत्तेजन या बळावर आपण पुढे आलो, सर्वांच्या प्रशंसेस पात्र ठरलो- याचे श्रेय आपण मनापासून कधी भास्करला दिले आहे? हे आठवणं या क्षणी अवघड!

आरश्यासमोर उभे राहणाऱ्याला प्रतिबिंबासोबत,आतल्या मनाशी सुध्दा बोलण्याची सवय असते- भारती स्वत:च्या आरश्यासमोर उभी राहून विचारू लागली-

खरयं! आपण बदलायला हवं!

# बारा लाख मराठी वाचकांसाठी ई चळवळ

कसं वाटलं पुस्तक? आवडलं? खुप आवडलं? अगदी प्रचंड आवडलं? तुम्ही आम्हाला सांगितलं तरच आम्हाला कळेल ना! तुमच्या मनोरंजनासाठी एवढं पानंच्यापानं लिहिणाऱ्या त्या लेखकाला, अरूण वि. देशपांडेना, तुम्ही काही ना काही कळवलंच नाहीत तर त्या पुढचं पुस्तक तुम्हाला कसं देणार? एक ई मेल तर पाठवायची. किंवा एक फोन.

इंटरनेटमुळे कधी नाही इतकं जग जवळ आलं. अत्यंत कमी खर्चात ई पुस्तकं बनवता येऊ लागली आणि लाखो वाचकांपर्यंत वितरण करणं शक्य झालं.

मराठी भाषेत किती तरी प्रतिभावान व्यक्ती साहित्याच्या बागा उभारू शकतील अशा क्षमतेच्या असतात. कधी कधी त्यांच्या या साहित्याचा आनंद लोकांपर्यंत कधीच पोहोचत नाही. दुसरीकडे असे लाखो वाचक असतात. ज्यांना काही नवीन छान साहित्य वाचायची इच्छा असते. पण त्यांना नवीन पुस्तकं मिळत नाहीत. प्रयोग परवडत नाहीत. कोणती घ्यावीत आणि वाचावीत ते कळत नाही. अशा वेळी ई साहित्य प्रतिष्ठानने नवीन साहित्यिकांसाठी ई पुस्तकांचे व्यासपीठ उभे केले. आणि लाखो वाचकांपर्यंत ही पुस्तके विनामूल्य वितरित करायला सुरूवात केली.

चार वर्षांपुर्वी स्थापन झालेल्या ई साहित्य प्रतिष्ठानने आजवर आपल्या वाचकांना अडिचशेहून अधिक, दर्जेदार, मराठी ई पुस्तके विनामूल्य दिली आहेत. मोरया, मीरा, कृष्णा, गुरुदेव रविंद्रनाथ, स्वा. विवेकानंद, विंदा करंदिकर, ग्रेस , नारायण सुर्वे, लोकमान्य टिळक, छत्रपती शिवाजी महाराज, शंभूराजे असे एकाहून एक सरस विषय आम्ही घेतले. चारशेहून अधिक नवीन साहित्यिकांना या व्यासपीठावरून सादर केले. त्यातील अनेकजण आज यशस्वी लेखक होताना दिसत आहेत. इंटरनेटवर मराठी भाषेतील साहित्य लोकप्रिय करण्याची चळवळ हिरिरीने पुढे नेली. प्रेम आणि सौंदर्याबरोबरच विद्यार्थी आणि शेतकऱ्यांच्या आत्महत्या, दहशतवाद, स्त्रियांवरील अत्याचार अशा ज्वलंत विषयांवरचं साहित्य मांडलं.

विनोदाला वाहिलेलं ई श्टाप देऊन हसवलं. लहान मुलांसाठी बालनेटाक्षरीची निर्मिती केली. शास्त्रीय संगीताची समज तरुणांत येण्यासाठी संगीत कानसेनचे ई वर्ग चालवले. नव्या कवींचे एक सुंदर व्यासपीठ म्हणजे नेटाक्षरी चालवले. तर महाराष्ट्रातल्या किल्ल्यांची माहिती देणाऱ्या पुस्तिकांची मालिका "दुर्ग दुर्घट भारी" द्वारे महाराष्ट्रातल्याच नव्हे तर जगभरातल्या मराठी मंडळींना मराठमोळ्या इतिहासाची उभारी दिली. "जिथे जिथे मराठी माणूस, तिथे तिथे ज्ञानेश्वरी" ही चळवळ आपण पहात आहातच. केवळ कविताच नव्हे तर कथा कादंबऱ्या, कॉमिक्स, गूढकथा, प्रवासवर्णनं, आणि गंभीर विषयांवरची पुस्तकेही आपल्याला इथे मिळतील.

सव्वा लाख रसिकांपर्यंत दर्जेदार साहित्य नियमितपणे विनामूल्य पोचवण्याची आमची परंपरा आम्ही सातत्याने चालू ठेवूच. आम्हाला हा उत्साह आणि प्रेरणा देणारी आपली पत्रेही येत राहू द्या. पण मनात एक विचार येतो. आपली वाचकसंख्या फ़क्त लाखभर लोकांपर्यंत मर्यादित का? १२ कोटी मराठी माणसांपैकी निदान १२ लाख वाचकांपर्यंत तरी हे विनामूल्य ई साहित्य पोचलंच पाहिजे असं नाही का वाटत आपल्याला? आणि त्यासाठी काही फ़ार करायची गरज नाही बंधो. आपल्या ओळखीच्या बारा लोकांची, फ़क्त बारा मराठी लोकांची मेल आय डी द्याल? जास्त दिलीत तरी हरकत नाही. पण निदान १२ मित्र किंवा नातेवाईकांची मेल आय डी पाठवा. असे लोक ज्यांनी मराठी साहित्य वाचावे अशी आपली इच्छा आहे. मराठी माणूस एकवेळ पैशांनी गरीब असेल, पण मित्रांच्या बाबतीत श्रीमंत असतो. एक लाख लोकांनी जर प्रत्येकी बारा आय डी पाठवले तर लाखाचे बारा लाख व्हायला कितीसा वेळ लागणार? बारा लोकांची मेल आयडी पाठवणाऱ्या वाचकांना आम्ही ई साहित्य पाठीराखे म्हणून वेगळे मानाचे स्थान देऊ. तुम्हाला आमच्या पुढील प्रवासाची कल्पना देत राहू. तुमच्या सूचना मागवू. तुमच्याकडून मार्गदर्शन घेत राहू. आमच्या पुढील प्रवासाचे तुम्ही सहप्रवासी असाल. होणार ना ई साहित्यचे पाठीराखे ?

आपल्या खास मराठी मित्र नातेवाईकांच्या बारा मेल आय डी esahity@gmail.com वर पाठवा.

खात्री बाळगा, या मेल्सचा कोणत्याही तऱ्हेने गैरवापर केला जाणार नाही. त्यांना जाहिराती किंवा फ़ालतू मेल पाठवून त्रास देणार नाही. यांचा उपयोग केवळ चांगले दर्जेदार मराठी साहित्य पाठवण्यासाठी केला जाईल.

www.esahity.com

www.ednyaneshwari.com

www.marathiriyasat.com